साप्ताहिक
संस्थापक साने गुरुजी
# साधना
१४ जानेवारी २०१७
किंमत ४० रुपये
एकूण पृष्ठे ८४

## महाराष्ट्र फाउंडेशन (अमेरिका) पुरस्कार २०१६

हमीद दलवाई | देवाजी तोफा | अरुण जाखडे
अरुण साधू | विजय दिवाण | अंजली जोशी
अतुल पेठे | सुशीला नाईक | अनिलकुमार साळवे


साहित्य


समाजकार्य



# महाराष्ट्र फाउंडेशन (अमेरिका)
# पुरस्कार निवडीचे निकष

मराठी ललित किंवा वैचारिक साहित्याच्या क्षेत्रांत आपल्या आयुष्यभराच्या कार्याने मोलाची भर घालणाऱ्या साहित्यिकाबद्दल कृतज्ञता व्यक्त करून त्याचा सन्मान करण्यासाठी दोन लक्ष रुपये आणि मानचिन्ह असा एक जीवनगौरव पुरस्कार दिला जातो. दरवर्षी ललित किंवा वैचारिक यांपैकी एकाच विभागात हा पुरस्कार दिला जातो.
या जीवनगौरव पुरस्कारासाठी नावांचा विचार करताना खालील बाबी विचारात घेतल्या जातात.

**जीवनगौरव : ललित साहित्याच्या संदर्भात...**

- ज्यांच्या साहित्यातून मानवी स्वातंत्र्य, समता, न्याय यांच्या प्रस्थापनेसाठी सामाजिक परिवर्तनाची जाणीव व्यक्त झाली आहे.
- ज्यांच्या साहित्यातून मानवी जीवनाचे समर्थ दर्शन घडविले गेले आहे.
- ज्यांच्या साहित्यातून सार्वकालीन व सार्वजनिक मूल्यांचा आविष्कार झालेला आहे.
- ज्यांच्या साहित्यामुळे मराठी साहित्याच्या संचितात मोलाची भर पडली आहे किंवा ज्यांचे साहित्य मराठी साहित्याच्या इतिहासात महत्त्वाचे ठरले आहे.

**जीवनगौरव : वैचारिक साहित्याच्या संदर्भात...**

इतिहास, तत्त्वज्ञान, समाजशास्त्र, राजकारण, अर्थशास्त्र, विज्ञान, साहित्य-संशोधन व समीक्षा यांसारख्या वैचारिक क्षेत्रांत ज्यांच्या मराठी लेखनामुळे महत्त्वाची भर पडली आहे.

- त्या त्या क्षेत्रात ज्या साहित्यिकांनी नि:स्पृह वृत्तीने व निर्भयपणे तात्त्विक सत्याचा शोध घेतला आहे.
- ज्यांची जाणीव मानवी स्वातंत्र्य, समता व न्याय यांच्या प्रस्थापनेसाठी सामाजिक परिवर्तनाच्या प्रेरणेने उद्युक्त झाली आहे.
- मराठी समाजाच्या सांस्कृतिक विकासाच्या दृष्टीने ज्यांचे लेखन महत्त्वाचे ठरले आहे.

**ग्रंथांसाठी पुरस्कार :**

समकालीन मराठी साहित्याला प्रोत्साहन म्हणून तीन मराठी ग्रंथांना प्रत्येकी पंचवीस हजार रुपयांचे पुरस्कार दिले जातात. पुरस्कार दिल्या जाणाऱ्या वर्षालगतच्या मागील तीन वर्षातील पुस्तकांचा विचार केला जातो. या वर्षी जानेवारी २०१२ ते डिसेंबर २०१४ या तीन वर्षांतील पुस्तके विचारात घेतली आहेत.

**रा. शं. दातार नाट्य पुरस्कार**

नाटक या प्रकारासाठी २००३ सालापासून हा पंचवीस हजार रुपयांचा पुरस्कार महाराष्ट्र फाउंडेशनतर्फे दिला जातो. एखाद्या महत्त्वाच्या सामाजिक समस्येविषयी आशयसंपन्न नाट्यकृती सादर करण्यात मोलाचा वाटा असणाऱ्या नाट्यकर्मीला हा पुरस्कार देण्याची योजना आहे.

**समाजकार्य पुरस्कार**

१९९६ पासून ‘समाजकार्य पुरस्कार योजना’ सुरू झाली. महाराष्ट्रात परिवर्तनवादी सामाजिक कार्य करणाऱ्या अनेक व्यक्ती व संस्था यांच्या कार्याचे मोल जाणून घेऊन त्याबद्दल त्यांचा कृतज्ञतापूर्वक सन्मान करावा या हेतूने हे पुरस्कार सुरू केले.
समाजप्रबोधन, स्त्रियांचे प्रश्न व पर्यावरण-संतुलन, संरक्षण तसेच परिवर्तनक्षम शैक्षणिक कार्य, दलितांचे प्रश्न आणि जातीय सलोखा या क्षेत्रांतील व्यक्तींना प्रत्येकी पन्नास हजार रुपयांचा कार्यकर्ता पुरस्कार देण्यात येतो.

२००५ पासून समाजबदलाच्या चळवळींमध्ये अविरत काम करणाऱ्या ज्येष्ठ कार्यकर्त्याला समाजकार्य जीवनगौरव पुरस्कार देऊन गौरविण्यात येते. दोन लाख रुपये व सन्मानचिन्ह असे या पुरस्काराचे स्वरूप आहे.
या गौरव पुरस्कारासाठी व्यक्तींच्या नावाचा विचार करताना खालील बाबी विचारात घेतल्या.
१.ज्या व्यक्ती आपले कार्य व विचार यांच्या साहाय्याने विवेकनिष्ठा, वैज्ञानिक दृष्टी व सामाजिक न्याय ही मूल्ये रुजवण्यासाठी सातत्याने प्रबोधनाचे कार्य करीत आहेत.
२.पर्यावरण संतुलनाचा ध्यास घेऊन त्यासाठी संशोधन, प्रयोग, लोकशिक्षण, जनसंघटन यांसारख्या विविध मार्गांनी निसर्गाच्या संरक्षणाकरता ज्या व्यक्ती अविरत कार्य करीत आहेत.
३.ज्या व्यक्तींच्या कार्यामुळे स्त्रियांमध्ये स्वावलंबन व स्वातंत्र्य यांविषयीच्या जाणीवा वाढत आहेत आणि अन्यायाविरुद्ध झगडण्याची त्यांची ईर्ष्या जागृत होत आहे.

**महाराष्ट्र फाउंडेशनच्या कोणत्याही पुरस्कारासाठी अर्ज करावे लागत नाहीत. निवड समित्यांचे सदस्य त्या त्या क्षेत्रांतील जाणकारांशी चर्चा करून प्रत्येक पुरस्कारासाठी तीन नावांची शिफारस अमेरिकेतील निवड समितीला करतात आणि त्यातून अंतिम निवड केली जाते.**

# अनुक्रम

## महाराष्ट्र फाउंडेशन (अमेरिका) साहित्य व समाजकार्य पुरस्कार २०१६




**१४ जानेवारी २०१७**
**वर्ष ६९ / अंक : २२**
संपादक :
**विनोद शिरसाठ**

**सहयोगी संपादक मंडळ :**
अभय टिळक,
अतुल देऊळगावकर,
मनोहर जाधव,
रझिया पटेल

मुखपृष्ठ मांडणी :
**गिरीश सहस्रबुद्धे**

अंकनिर्मिती व्यवस्थापक
व अक्षररचना :
**सुरेश माने**

मुद्रितशोधन :
**मिलिंद बोरकर**

हे साप्ताहिक मुद्रक, प्रकाशक हेमंत नाईकनवरे यांनी कॉम्प-प्रिंट कल्पना प्रा.लि., पुणे येथे छापून,
**साधना साप्ताहिक, ४३१ शनिवार पेठ, पुणे ४११०३०.** येथे प्रकाशित केले.
Ph.: (020) 24451724
Mob.: 7028257757
weeklysadhana@gmail.com
web.weeklysadhana.com








**साधना मीडिया सेंटर**
**(पुस्तकविक्री विभाग)**
Ph.: (020) 24459635

वार्षिक वर्गणी :
**एक वर्षांसाठी : ७०० रुपये**
**दोन वर्षांसाठी : १४०० रुपये**
**तीन वर्षांसाठी : २१०० रुपये**

नाव, पत्ता, फोन नं व इ-मेल इत्यादी तपशील कळवून रोख/म.ऑ./डी.डी./चेक 'साधना साप्ताहिक' या नावाने काढून, वर्गणीची रक्कम साधना कार्यालयाकडे पाठवावी. किंवा साधना साप्ताहिक, खाते क्र. 60025586634, IFSC MAHB 0000001, बँक ऑफ महाराष्ट्र, बाजीराव रोड शाखा, पुणे येथे वर्गणीची रक्कम जमा करावी आणि नाव, पत्ता, फोन नं. इत्यादी तपशील साधना कार्यालयाला इ-मेल/फोन करून कळवावेत.








संपादकीय

**स्थापण्या समता शांती ठेवुनी शुद्ध साधनां ।**
**करिती साधना त्यांना ठेवो उत्स्फूर्त साधना ।।**

# साहित्य 181 आणि समाजकार्य 118

अमेरिकेत स्थायिक झालेल्या मराठी माणसांनी स्थापन केलेल्या महाराष्ट्र फाउंडेशन या संस्थेच्या वतीने, १९९४ पासून साहित्यक्षेत्रातील तर १९९६ पासून समाजकार्य क्षेत्रातील व्यक्तींना वा संस्थांना त्यांच्या उल्लेखनीय व अनुकरणीय योगदानासाठी पुरस्कार देऊन गौरविले जाते. म्हणजे साहित्य पुरस्कारांचे हे २३ वे तर समाजकार्य पुरस्कारांचे हे २१ वे वर्ष आहे. पहिली १५ वर्षे या पुरस्कारांचे संयोजन मुंबई येथील केशव गोरे स्मारक ट्रस्टच्या वतीने केले गेले, नंतरची सात वर्षे या पुरस्कारांचे संयोजन पुणे येथील साधना ट्रस्टच्या वतीने केले गेले. या वर्षीच्या पुरस्कारांचे संयोजन दोन्ही ट्रस्टकडून संयुक्तपणे केले जात आहे. महाराष्ट्र फाउंडेशनच्या पुरस्कारांची निवडप्रक्रिया, एका बाजूला गोपनीय, तर दुसऱ्या बाजूला पारदर्शक पद्धतीने पार पाडली जाते. म्हणजे पुरस्कार मिळवण्यासाठी अर्ज करावे लागत नाहीत, पण महाराष्ट्रातील जाणकारांकडून शिफारशी मागवल्या जातात. पुरस्कार देण्यासाठी व्यक्ती वा संस्था यांच्या निवडीसाठी भारतात व अमेरिकेत वेगवेगळ्या निवड समित्या असतात आणि त्यांची नावे जाहीरही केली जातात; पण अंतिम शिफारशी कोणत्या होत्या, हे मात्र गोपनीय ठेवले जाते. महाराष्ट्र फाउंडेशन, संयोजक संस्था आणि विविध निवड समित्या, यांच्यातील उत्तम समन्वयामुळेच हे घडून येते.

पुरस्कारासाठी व्यक्तीची वा संस्थेची निवड करताना त्यांचे विचार व कार्य भारतीय संविधानातील मूल्यांना पुढे घेऊन जाणारे आहे ना, याची काळजी घेतली जाते. जात, धर्म, भाषा, प्रांत, लिंग या प्रमुख पाच प्रकारांतील संकुचितपणा टाळण्याचा प्रयत्न करणाऱ्यांना म्हणजे पुरोगामित्वाच्या दिशेने वाटचाल करणाऱ्यांना बळ देणे, हा या पुरस्कारांचा प्रधान हेतू आहे. प्रतिकूल परिस्थितीशी संघर्ष करणारे, मूल्यविवेक जपत कार्यरत राहणारे, वेगळ्या वाटा चोखाळत सकारात्मक बंडखोरी करणारे आणि सामाजिक बदलांचे प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे वाहक असणारे लोक या पुरस्कारांसाठी प्राधान्याने निवडले जातात. आणि म्हणूनच, महाराष्ट्राच्या साहित्य व सामाजिक क्षेत्रांत या पुरस्कारांना वेगळी प्रतिष्ठा व मान्यता प्राप्त झाली आहे. या पुरस्कारांचे प्रवर्तक सुनील देशमुख व महाराष्ट्र फाउंडेशनमधील त्यांचे सहकारी, दरवर्षी पुरस्कार निवडप्रक्रिया व पुरस्कार वितरण समारंभ यथायोग्य पद्धतीने होत राहील यासाठी पुरेसे दक्ष असतात; पण त्याच वेळी संयोजक संस्थेची स्वायत्तता व वस्तुस्थितीच्या मर्यादा पुरेपूर समजूनही घेतात. त्यामुळे १९९४ पासून सुरू झालेल्या या पुरस्कारांची देदीप्यमान परंपरा, आता पावशतकाच्या उंबरठ्यावर आहे आणि आतापर्यंत दिल्या गेलेल्या एकूण पुरस्कारांची संख्या ३०० च्या घरात गेली आहे.

मागील २३ वर्षांत मिळून दिलेल्या एकूण साहित्य पुरस्कारांची संख्या आहे- १८१, तर मागील २१ वर्षांत मिळून दिलेल्या एकूण समाजकार्य पुरस्कारांची संख्या आहे : ११८ (आकडेही कसे जुळून आले आहेत पाहा.) म्हणजे दोन्हींची मिळून संख्या आहे : २९९. यामध्ये एकाही व्यक्तीला मरणोत्तर पुरस्कार दिला गेलेला नाही. या वर्षीच्या समारंभात सर्वांत शेवटी समाजकार्य जीवनगौरव पुरस्कार हमीद दलवाई यांना दिला जाईल, तेव्हा महाराष्ट्र फाउंडेशनचा मरणोत्तर पुरस्कार दिला गेला आहे, अशी हमीद दलवाई ही पहिली व्यक्ती ठरणार आहे. आणि जुळून आलेला आणखी एक योग असा की, दलवाईंना दिलेला पुरस्कार महाराष्ट्र फाउंडेशनचा ३०० वा पुरस्कार असेल. दहा वर्षांपूर्वी डॉ.नरेंद्र दाभोलकर यांना अमेरिकेत बोलावून 'दशकातला सर्वोत्तम कार्यकर्ता' हा पुरस्कार दिला गेला होता; तो जमेस धरला तर दलवाईंना दिला गेलेला पुरस्कार या मालिकेतला ३०१ वा पुरस्कार असेल. असो. महत्त्वाचे काय, तर दलवाईंच्या मृत्यूनंतर ४० वर्षांनी त्यांना समाजकार्य जीवनगौरव पुरस्कार दिला जातो आहे, याकडे महाराष्ट्रातील पुरोगाम्यांनी विशेष गांभीर्याने पाहावे, असा या वर्षीचा 'सांगावा' आहे!

साहित्य जीवनगौरव पुरस्कार
(स्मृतिचिन्ह व दोन लाख रुपये)

विशेष ग्रंथ पुरस्कार
(स्मृतिचिन्ह व पंचवीस हजार रुपये)

ललित ग्रंथ पुरस्कार
(स्मृतिचिन्ह व पंचवीस हजार रुपये)

रा. शं. दातार नाट्य-पुरस्कार
(स्मृतिचिन्ह व पंचवीस हजार रुपये)



## साहित्य पुरस्कारांचे स्वरूप

डॉ. नरेंद्र दाभोलकर स्मृति पुरस्कार :
(स्मृतिचिन्ह व एक लाख रुपये)



## समाजकार्य पुरस्कारांचे स्वरूप

समाजकार्य जीवनगौरव :
(स्मृतिचिन्ह व दोन लाख रुपये)

कार्यकर्ता पुरस्कार : प्रबोधन
(स्मृतिचिन्ह व पन्नास हजार रुपये)

कार्यकर्ता पुरस्कार : सामाजिक प्रश्न
(स्मृतिचिन्ह व पन्नास हजार रुपये)

कार्यकर्ता पुरस्कार : असंघटित कष्टकरी
(स्मृतिचिन्ह व पन्नास हजार रुपये)



समाजकार्य
जीवनगौरव
## हमीद दलवाई
(मरणोत्तर)

**संवादक : 'मनोहर'चे वाचक**

१९३२ ते ७७ अशी जेमतेम ४५ वर्षे आयुष्य लाभलेल्या हमीद दलवाई यांनी थोडेच पण कसदार ललित व वैचारिक लेखन केले आहे, ते काळाच्या पुढे धावणारे आहे. पण त्याचबरोबर त्यांनी मुस्लिम समाजातील सुधारणांना बळ देण्यासाठी निर्भीडपणे अनेक प्रबोधन-कृतीकार्यक्रम राबवले. अखिल भारतीय स्तरावर अशी रॅशनल भूमिका घेणारा व राष्ट्रीय एकात्मता हे अंतिम उद्दिष्ट मानणारा हा कृतीशील विचारवंत होता. त्यांचे विचार व कार्य पुढे घेऊन जाणे ही आजच्या काळाचीही गरज आहे, हा संदेश देण्यासाठी आणि त्यांचा वारसा सांगत कार्यरत असणाऱ्यांना बळ देण्यासाठी हा मरणोत्तर पुरस्कार दिला जात आहे.



दलवाईंनी लिहिलेल्या एकूण २५ लघुकथा 'लाट' व 'जमीला जावद' या दोन पुस्तकांत संग्रहित केलेल्या आहेत. त्यातून सर्वसामान्य मुस्लिम माणूस, मुस्लिम समाज, संस्कृती आणि परंपरा यांचे स्तिमित करणारे दर्शन घडते. याशिवाय 'इंधन' ही त्यांची कादंबरी मराठीतील एक माइलस्टोन मानली जाते. 'इस्लामचे भारतीय चित्र', 'राष्ट्रीय एकात्मता व भारतीय मुसलमान', आणि 'भारतातील मुस्लिम राजकारण' या तीन पुस्तकांत दलवाईंचे वैचारिक लेखन संग्रहित करण्यात आले आहे. त्यातून अखिल भारतीय स्तरावरील मुस्लिम समाज, त्यातील स्थित्यंतरे आणि जागतिक स्तरावरील इस्लामचे राजकारण यांची चिकित्सा केलेली आहे. धर्मनिरपेक्षता आणि लोकशाही ही दोन मूल्ये दलवाईंच्या विचारांच्या केंद्रस्थानी आहेत. त्यातून परंपरावादाला नकार आणि ऐहिकतेचा स्वीकार यांचा जोरदार पुरस्कार केलेला आहे.

इतिहासकार रामचंद्र गुहा यांनी त्यांच्या 'मेकर्स ऑफ मॉडर्न इंडिया' या ८०० पानी ग्रंथात १९ व्यक्तींचा समावेश केला आहे. त्या एकोणीस आधुनिक भारताच्या निर्मात्यांपैकी एक आहेत हमीद दलवाई. ज्यांच्या विचारांचे प्रतिबिंब भारताच्या संविधानात आहे आणि ज्यांचे विचार आजच्या भारताला आधुनिक करण्यासाठी उपयुक्त आहेत, अशा व्यक्तींमध्ये दलवाईंची गणना गुहा यांनी केलेली आहे.

हमीद दलवाई यांनी केलेले सर्व लेखन मुस्लिम समाजाच्या सुधारणेसाठी, उत्थापनासाठी केलेले आहे. वय वर्ष २० ते ४५ अशी एकूण २५ वर्षे त्यांनी ललित व वैचारिक लेखनाच्या माध्यमातून महाराष्ट्रातील मुस्लिम समाजसुधारणेच्या क्षेत्रात पायाभरणी करून ठेवलेली आहे. त्याशिवाय शेवटची २० वर्षे म्हणजे वय वर्षे २५ ते ४५ या काळात त्यांनी महाराष्ट्रात वेगवेगळ्या शहरांमधून मुस्लिम समाजाचे आणि त्यातही प्रामुख्याने मुस्लिम स्त्रियांचे प्रश्न उपस्थित करण्यासाठी परिषदा, बैठका, भाषणे, परिसंवाद यांचे आयोजन केले होते.

आज भारतात आणि जागतिक स्तरावरही धर्मांध शक्तीचे प्राबल्य वाढताना दिसते आहे. धर्मनिरपेक्षता आणि लोकशाही यांचा आग्रह धरणाऱ्या शक्ती निष्प्रभ होत आहेत. म्हणून दलवाईंना मरणोत्तर जीवनगौरव पुरस्कार मिळण्याला विशेष अर्थ आहे. या पार्श्वभूमीवर २६ ऑगस्ट १९७३च्या 'मनोहर' साप्ताहिकात प्रसिद्ध झालेली ही मुलाखत पुनर्मुद्रित करीत आहोत.

**प्रकाश भागवत** (यवतमाळ) : जातीय दंगलींना मुख्यत: कोण जबाबदार आहे?

– जातीय दंगलींना बरेचदा मुसलमान आणि अनेकदा हिंदू जबाबदार असतात.

**मेधा गोळवलकर** (दादर) : आपल्या विचारसरणीत आणि भारतीय जनसंघाच्या ध्येयधारणात काय मतभेद आहेत?

– मला गोहत्याबंदी साफ अमान्य आहे. व्यक्तीच्या समानतेवर नवी समाजरचना अस्तित्वात यावी असे मला वाटते. अलीगड व बनारस या विद्यापीठांच्या नावातून अनुक्रमे मुस्लिम व हिंदू हे शब्द गाळण्यात यावे व ती राष्ट्रीय विद्यापीठे म्हणून

# ...तरीही मी मुसलमान आहे!

मी नमाज पडत नाही, उपवास करीत नाही.
कारण हे ईश्वरनिर्मित नसून
महंमदनिर्मित आहे असे मी मानतो.
यामुळे आखीरतवर माझा विश्वास नाही,
हे ओघानेच आले. आणि तरीही मी
मुसलमान आहे, कारण मी मुस्लिम
समाजात जन्माला आलो आहे.
नेहरू निरीश्वरवादी होते आणि तरीही
ज्या अर्थाने हिंदू होते, त्या अर्थाने
मी मुसलमान आहे. कारण मुस्लिम अथवा
हिंदू असणे याची केवळ पोथीबद्ध
व्याख्या मी मान्य करीत नाही.
ती अधिक व्यापक आहे असे मी मानतो.





घोषित करावीत असेही माझे मत आहे. स्त्रियांना पुरुषांइतकेच समान अधिकार असावेत म्हणून मी समान नागरी कायद्याचा गेली काही वर्षे सातत्याने पाठपुरावा करीत आहे. सर्वांनीच कुटुंबनियोजन करावे इतकेच नव्हे तर, ते सर्वांना सक्तीचे व्हावे असे माझे मत आहे. थोडक्यात या देशाचे शासकीय निर्णय कुठल्याही धर्मसमुदायाला काय प्रिय किंवा अप्रिय आहे किंवा काय मंजूर किंवा नामंजूर आहे, यावरून न ठरवता, या देशातील कोट्यवधी जनतेच्या आर्थिक आणि सामाजिक उन्नतीकरता काय आवश्यक आहे याचा विचार करून ठरविले जावे असे मला वाटते. जनसंघाचे यासंबंधी कोणते धोरण आहे हे आपल्याला या पक्षाच्या ध्येयधोरणविषयक सिद्धांतात सापडू शकेल. मेधाबाई, आमच्यातील मतभेद हुडकून काढणे आपल्याला वरील उत्तरावरून सोपे जाईल, अशी मी आशा बाळगतो.

**अशोक परब** (जोगेश्वरी) : आंतरजातीय विवाहाबद्दल आपले प्रामाणिक मत काय?

– आंतरजातीय विवाह ज्यांना करायचे असतील त्यांना अनिर्बंधपणे करता आले पाहिजेत असे माझे मत आहे. विवाह ही व्यक्तिगत बाब आहे, त्यात इतरांनी लुडबूड करू नये असे मी मानतो.

मी मांडीत असलेली सर्वच मते प्रामाणिक असल्यामुळे माझे हे मत प्रामाणिक आहे, हे लिहायची आवश्यकता नाही असे मला वाटते.

**रमेश उदारे** (मुंबई) : 'जो मूर्तिपूजक त्याचा समूळ नाश करा' असं विधान कुराणात आहे का?

– आपण म्हणता तसे विधान नाही. मात्र मूर्तिपूजकवर, त्यांना अवमानीत करण्यासाठी कर लावावा असे एक विधान आहे. यातूनच 'जिझिया'कराचा जन्म झाला आहे.

वास्तविक कुराणामध्ये काय लिहिले आहे, यापेक्षा आपण आत्ता मानवी संबंध कोणत्या पातळीवर ठेवायचे हा प्रश्न महत्त्वाचा आहे. अशा प्रकारची सामाजिक समतेचा पुरस्कार करणारी विधाने सर्वच धर्मशास्त्रात आढळतील. मनुस्मृतीनेदेखील स्त्रियांना आणि कनिष्ठ वर्गीयांना समान स्थान दिलेले नाही. आता भारतीय समाज मनुस्मृती अथवा कुराणचे आदेश यावर आधारलेला राहणार नाही. भारतीय समाज जडणघडण सर्व व्यक्तीच्या समानतेवर आधारलेली असेल, हे हिंदू आणि मुसलमान या दोहोंनी ओळखणे आवश्यक आहे.

**प्रकाश भागवत** (यवतमाळ) : जातीय दंगलींना मुख्यत: कोण जबाबदार आहे?

– जातीय दंगलींना बरेचदा मुसलमान आणि अनेकदा हिंदू जबाबदार असतात.

**अ. रा. कस्तुरे** (गुलटेकडी) : भारताबाहेर मुस्लिम आणि मुस्लिमेतरांचे संबंध कसे काय आहेत?

– काही ठिकाणी चांगले आहेत. काही ठिकाणी वाईट आहेत. उदा. इंडोनेशियात ख्रिश्चन, बौद्ध व हिंदू अल्पसंख्यांक आहेत, पण तेथे धार्मिक तणाव नाहीत. मलेशिया, तुर्कस्तान, लेबेनान, ट्युनिशिया इत्यादी देशांत बिगरमुस्लिम अल्पसंख्याक राहतात आणि त्यांचे संबंध चांगले आहेत. काही अरब देशांतून ज्यू आणि ख्रिश्चन यांची हकालपट्टी झालेली आहे. पाकिस्तानात हिंदू व शीख अल्पसंख्याक राहिलेले नाहीत. बांगलादेशामध्ये आता हिंदू अल्पसंख्याकांना सुरक्षितता लाभलेली आहे असे हे चित्र आहे.

**महादेव कोकाटे, चंद्रकांत धर्माधिकारी** (अंधेरी) : जातीयवादी मुसलमानांची संख्या वाढताच भारतात पुन्हा नव्या 'पाक'ची मागणी होण्याची शक्यता आहे, असं आपल्याला नाही का वाटतं?

– जातीयवादी मुसलमान कोणती मागणी करतील यासंबंधी आपण फारशी चिंता बाळगण्याचे कारण नाही. ते 'भेंडीबाजारात पाकिस्तान हवे' असेसुद्धा सांगतील. त्यांनी अशी मागणी केल्यामुळे तसे काही आता घडण्याची शक्यता आहे असे समजणे बरोबर ठरणार नाही. एक तर आता वेगळे राष्ट्र द्यायला परकीय सत्ता अस्तित्वात नाही आणि मुस्लिम बहुसंख्यांकाचे राष्ट्रनिर्मितीसाठी आवश्यक एवढे मोठे प्रदेश अस्तित्वात नाहीत.

**महंमद समी कॉन्ट्रॅक्टर** (औरंगाबाद) : आपण स्वत:ला मुसलमान समजता का? असल्यास नमाज, रोजा, कुराण आणि आखीरत याबद्दल आपली धारणा काय आहे?

– मी नमाज पडत नाही, उपवास करीत नाही. कारण हे ईश्वरनिर्मित नसून महंमदनिर्मित आहे असे मी मानतो. यामुळे आखीरतवर माझा विश्वास नाही, हे ओघानेच आले. आणि तरीही मी मुसलमान आहे, कारण मी मुस्लिम समाजात जन्माला आलो आहे. नेहरू निरीश्वरवादी होते आणि तरीही ज्या अर्थाने हिंदू होते, त्या अर्थाने मी मुसलमान आहे. कारण मुस्लिम अथवा हिंदू असणे याची केवळ पोथीबद्ध व्याख्या मी मान्य करीत नाही. ती अधिक व्यापक आहे असे मी मानतो.

**बाळ जांभेकर** (वसई) : तुमचे राजकीय गुरु कोण? तसेच बाळ ठाकऱ्यांप्रमाणे तुमच्याबरोबर शरीररक्षक असतात काय?

– माझा राजकीय गुरु मीच. शरीररक्षक ठेवायला पैसा कुठे आहे?

**गुलाम अहमद** (औरंगाबाद) : महाराष्ट्रातील दहा टक्केच मुस्लिम मराठी भाषा समजतात. तरी तुम्ही तुमचं कार्य मराठीतून का करता?

– महाराष्ट्रातील नव्वद टक्के मुसलमान मराठी समजतात. फक्त शहरी विभागातील दहा टक्के मुसलमान मोडकेतोडके उर्दू जाणतात. हे उर्दूदेखील 'धावत धावत म्हावर लानेको गया'' किंवा ''झाडावरनं पडल्याबरोबर पाव फुट्या' अशा पद्धतीचे उर्दू बोलतात. हे उर्दू ऐकून लखनौच्या उर्दू भाषिकाला चक्क मूर्च्छाच येत असेल!

गुलाम अहमदभाई, आमचे कार्य आम्ही मराठीत का करतो, हे आता आपल्या लक्षात आले ना?

**सुधीरकुमार आचार्य** (कल्याण) : समाज–सुधारणेच्या कार्यक्रमात आपणास आपल्या कुटुंबीयांचे साह्य कितपत मिळते?

– अनेक प्रकारे मिळते. कुटुंबीय म्हणजे कोण, हे आपण स्पष्ट केलेले नाही. माझी पत्नी नोकरी करून द्रव्यार्जन करते आणि पर्यायाने माझ्यावरील कौटुंबिक जबाबदारीचा भार कमी करते, हेही मोठेच साह्य आहे असे मी मानतो.

**स्वामीप्रसाद पंडित** (पिंपरी) : सर्जनशील लेखक राजकारणात पडल्यास त्याला ते कितपत साधेल? आपण एक समर्थ ललित लेखक आहोत, सध्या ललित लेखन सोडले का?

– राजकारण मला कितपत साधले आहे यावरून आपणच आपल्या प्रश्नाचे उत्तर शोधणे योग्य ठरेल. ललित लेखनाला पुरेशी मनाची उसंत मिळत नाही. त्याची खंतही वाटते. खंत वाटणे ही बाब कदाचित मी पुन्हा ललित लेखन करू शकेन असा दिलासा आपल्याला द्यायला तूर्त पुरेशी आहे.

**मीनाक्षी ताटके** (पुणे) : आपली स्वत:ची धर्माबद्दलची मते जी काही आहेत, ती घरातील सर्व मंडळींना विशेषत: आई, वडील, पत्नी, मुले यांना पटतात का?

– पटतातच असे नव्हे, पटावीत असा माझा आग्रहही नसतो. त्यांचा दृष्टिकोन त्यांनी माझ्यावर लादू नये. प्रत्येकाला धार्मिक मतस्वातंत्र्य असावे, असे मी मानतो. या दृष्टीने आम्ही आमच्या घरात लोकशाही स्वातंत्र्य अंमलात आणले असून, शांततामय सहजीवनाचे युग सुरू केले आहे. आपण हा प्रयोग करून पहायला काही हरकत नाही.

**शेख सिराज अहमद** (समशेरपूर) : महाराष्ट्रातील बहुसंख्य मुस्लिम समाज ग्रामीण भागात राहात असताना, सत्यशोधक समाज शहरी भागात का?

– कुठलीही चळवळ प्रथम शहरात सुरू होते. मागाहून ती ग्रामीण भागात पसरते. आमची चळवळ आता सुरू झाली आहे. ती वाढेल तशी ग्रामीण भागात पसरेल. सध्या ती शहरातच का, याचे उत्तर आपल्याला सापडले ना?

**संजीव पोहेकर** (बुलढाणा) : जर तुम्हाला 'ब्लॅक डिसेंबरने' खुनाची धमकी दिली तर तुम्ही काय कराल?

– तुम्हाला मदतीला बोलावेन!

**अरुण चव्हाण** (सातारा) : हिंदूंच्या सहिष्णुतेमुळे आज भारतात मुसलमान सर्वसाधारणपणे सुखाने कालक्रमणा करीत असताना, मुसलमान समाज आपल्यात एकरूप का होऊ शकत नाही?

– या प्रश्नाचे समग्र उत्तर द्यायला एक प्रबंधच लिहावा लागेल. मुस्लिम समाजातील विभक्तवादी चळवळी त्या समाजाला एकरूप होऊन देत नाहीत, हे आपल्या प्रश्नाचे




थोडक्यात उत्तर होऊ शकेल. पण हिंदूंना आधुनिक बनवूनच मुस्लिम समाजातील विभक्ततावाद मोडावा लागेल.

**सुधाकर जोशी** (जामनेर) : राष्ट्रीय स्वयंसेवक संघ जातीय आहे काय?

– राष्ट्रीय स्वयंसेक संघ जातीय आहे, असा त्यांच्या प्रवक्त्यांचाच दावा आहे. संघाच्या नेत्यांची भाषणे, त्यांचे लिखाण आणि त्यांनी वेळोवेळी घेतलेली भूमिका यावरून आपल्याला याची प्रचिती येईल.

**विश्वास डिग्गीकर** (उमरगा) : राजकारणातील चांगली माणसे आर्थिक दृष्ट्या भक्कम असलेली क्वचितच आढळतात, म्हणून विचारतो आपल्या उपजीविकेची साधने कोणती?

– मला सी.आय.ए. (अमेरिकन गुप्तहेर संघटना), के.जी.बी. (रशियन गुप्तहेर संघटना), ख्रिश्चन धर्मोपदेशक, राष्ट्रीय स्वयंसेवक संघ, जनसंघ, तसेच पंतप्रधान इंदिरा गांधी यांच्यासारख्या परस्परविरोधी विचारसरणीच्या व्यक्ती व संघटना यांच्याकडून पैसा पुरविण्यात येतो, असे मुस्लिम जातीयवाद्यांचे म्हणणे आहे. तर मी पाकिस्तानाचा छुपा हस्तक असून, याह्याखान व सध्या झुल्फिकार अली भुट्टो मला पैसा पुरवतात, असे काही निवडक हिंदुत्ववादी आपसात कुजबुजत असतात.

वस्तुस्थिती अशी आहे की, मी 'इंडियन सेक्युलर सोसायटी'चा पूर्णवेळ कार्यकर्ता असून, सोसायटीकडून उपजीविकेला आवश्यक तेवढे मानधन घेतो. तसेच माझी पत्नी नोकरी करते व मुंबईच्या उपनगरात एका चाळीवजा डबल रूममध्ये मी राहतो. देणग्या मिळवून तसेच काही कार्यक्रमाच्या निमित्ताने स्मरणिकाद्वारा जाहिराती मिळवून आम्ही सोसायटीला आर्थिक साहाय्य मिळवतो.

विश्वासराव, आपला माझ्यावर विश्वास असेल असे समजून माझ्या उपजीविकेविषयी आपले मत बनविणे, मी आपल्या सदसद्विवेकबुद्धीवर सोपवतो.

**व्यंकटेश लिगदे** (मुंबई) : सर्वांसाठी समान नागरी कायदा इंदिरा सरकार का लागू करत नाही? 'एकगठ्ठा' मतासाठी मुसलमानांच्या 'शारियत'मध्ये बदल करणार नाही असे काँग्रेसवाले म्हणतात, ते खरं आहे काय?

– आपण एकूण दोन प्रश्न विचारले आहेत. पहिला प्रश्न तुम्ही इंदिरा गांधींना विचारणे बरे! 'एक गठ्ठा' मतासंबंधीचे आपले मत खरे आहे, परंतु काँग्रेसचे नेते 'आम्ही मुस्लिम कायद्यात सध्या बदल करणार नाही' असे म्हणत असतात. यातील 'मुस्लिम कायद्यात' आणि 'सध्या' हे काँग्रेसजनांचे दोन शब्दप्रयोग फार महत्त्वाचे आहेत. भारतात मुसलमानांना 'मुस्लिम कायदा' अस्तित्वात आहे, 'शरियत' नव्हे. शरियत सौदी अरेबिया वगळता इतर कुठेच अस्तित्वात नाही. आणि 'सध्या कायदा करणार नाही' याचा अर्थ, वेळ येताच करू असा मी तरी घेतो.

**दिलीपकुमार पाटणेकर** (चिपळूण) : हमीदभाई, मुस्लिम लीग ही मुसलमानांना शाप आहे की वरदान?

– शाप! केवळ मुसलमानांनाच नव्हे तर हिंदूंना, तसेच आपल्या देशालाही तो शापच आहे असे मी समजतो.

**सुबोध वि. थरवळ** (खेड, रत्नागिरी) : इस्लाम हा जास्तीत जास्त लोकशाहीवादी आणि समताप्रधान धर्म आहे. आपले मत काय?

– कुठलाच धर्म लोकशाहीवादी तसेच समतावादी नाही. इस्लामही ह्याला अपवाद नाही. धर्म आध्यात्मिक पायावर समाजाची उधारणी करीत असतात. ते मध्ययुगीत आहेत आणि लोकशाही, स्वातंत्र्य, समानता या आधुनिक कल्पना आहेत. धर्माच्या पायावर आता सुसंस्कृत समाजव्यवस्था निर्माण होऊ शकणार नाही, हे आपण सगळ्यांनी ओळखले पाहिजे.

**दिगंबर पाठक** (अमरावती) : आपण नेहमी हिंदू-मुसलमान ऐक्याबद्दल लिहिता-बोलता, परंतु आजचा सुशिक्षित मुसलमान समाजसुद्धा भारताबद्दल आपुलकी जिव्हाळा, दाखववायास तयार नाही, हे बऱ्याच घटनांनी दाखवून दिलेले आहे. यावर आपले मत काय?

– मी काय मत सांगणार? भारतीय सुशिक्षित मुसलमान समाज भारताबद्दल जिव्हाळा दाखवत नाही, असे मीच अनेक उदाहरणे देऊन म्हटले आहे. आणि माझ्या या मताबद्दल माझे मत काय, असा प्रश्न आपण मला विचारता! इतका विनोदी प्रश्न विचारल्याबद्दल आपल्याला 'मनोहर'चे (ललित पद्धतीचे) 'नोबेल'

पारितोषिक दिले पाहिजे, असे माझे मत आहे.

**क्षमा तावडे** (मुंबई) : मुसलमान लोक कुटुंब नियोजनाला विरोध करतात, हा देशद्रोह नाही का?

– कुटुंबनियोजनाला सनातनी मुसलमान, कॅथॉलिक समाज, जनसंघाचे काही काही नेते, राष्ट्रीय स्वयंसेक संघ, पुरीचे शंकराचार्य आणि आचार्य विनोबा भावे इतक्यांचा विरोध आहे. ही सर्व मंडळी राष्ट्रद्रोही आहेत, असे आपल्याला सुचवायचे आहे काय?

वस्तुत: या देशाच्या कोट्यवधी जनतेच्या आर्थिक उन्नतीकरता जी राष्ट्रीय धोरणे आपण आखली आहेत. ती सर्वांनी अंमलात आणली पाहिजेत असे माझे मत आहे. कुटुंबनियोजन हे त्यातील एक धोरण आहे. ते सर्वांना सक्तीचे केले पाहिजे असे मी मानतो.

त्याचबरोबर ज्या देशात भाकड गुरांची संख्या प्रचंड आहे आणि त्यांची संख्या पद्धतशीरपणे तेहतीस टक्के कमी करण्याची जरूरी आहे, असे देशातील बहुसंख्याक शेती–अर्थतज्ज्ञ सांगत असताना गोहत्याबंदीचा पुरस्कार करणे हेही देशाच्या प्रगतीत खीळ घालणारे आहे, असे आपल्याला नाही का वाटत?

**विनोद वि. तंत्रे** (नाशिक) : बांगला–देशातील सध्याच्या परिस्थितीबद्दल तुम्हाला काय वाटते?

– बांगलादेश नुकताच स्वतंत्र झाला आहे आणि मुक्तिलढ्याच्या काळात तेथे प्रचंड विध्वंस होऊन चुकला आहे. यामुळेच तेथे सध्याचे अस्थिर वातावरण दिसते आहे. आर्थिक पुनर्रचनेचा वेग वाढला की, तेथे हळूहळू राजकीय स्थैर्य प्राप्त होईल. आणि भारताशी त्याचे संबंध चांगले राहतील असेही मला वाटते.

**श्यामकांत कुलकर्णी** (मालेगाव) : आपणास हिंदू होणे आवडेल काय?

– या आधी श्री.महंमद समी कॉन्ट्रॅक्टर यांनी विचारलेल्या प्रश्नाला मी दिलेल्या उत्तराकडे आपले लक्ष वेधू इच्छितो. मी जन्माने मुसलमान आहे आणि संस्कृतीने हिंदू आहे. त्यामुळे मी हिंदू अथवा मुसलमान न राहता, चांगला माणूस बनावे या माझ्या आंतरिक इच्छेकडे एक पाऊल तरी प्रगती केली आहे असे मला वाटते. कारण धर्म ही बाब आता रूढ अर्थाने कालबाह्य झाली आहे, असे मी समजतो.

श्यामकांतराव, याकरता तूर्त मला माणूस म्हणूनच राहू द्या! उगाच हिंदू–मुस्लिमात माझी ओढाताण करू नका!

**सुलभा बाकरे** (अमरावती) : आपल्या कार्यात आपल्याला पदोपदी अपेक्षाभंग, अपमान, निराशा पदरी येत असेल. अशावेळी माणसाला आपलं मन हलकं करायला, कुणाचा तरी आधार, सहानुभूती हवी असते, तर असे आपले आधारस्थान कोणते?

– मी या दृष्टीने खरोखरच कधी विचार केला नव्हता. आपली कल्पना चांगली आहे. मी तिच्यावर विचार करतो आहे.

**रवींद्र अफझुलपूरकर** (सोलापूर) : केवळ ब्राह्मण, पारशी यांसारख्या अल्पसंख्य जाती सोडून इतर ‘अल्प(?)संख्य’ जातींबद्दल सरकारने जे धोरण अवलंबिले आहे, ते मुसलमानधार्जिणेच आहे. निधर्मी नव्हे, खरे की नाही?

– मुसलमानांकडे ‘गठ्ठा’ मते आहेत म्हणून सत्ताधारी पक्ष त्यांना सांभाळून घेते असे आपल्या प्रश्नांचे योग्य उत्तर ठरेल.

**अनिल चनाखेकर :** बुद्धिवादी मुसलमान मध्यमवर्गीयांअभावी मुस्लिम समाजात वैचारिक क्रांती होणे अशक्यप्राय आहे. हा समाज निर्माण करण्यात आपण कशा दृष्टीने प्रयत्नशील आहात?

– मुस्लिम सत्यशोधक मंडळाचे कार्य हा अशा प्रकारचे वैचारिक नेतृत्व निर्माण करण्याचा एक प्रयत्न आहे.

**गणेश परशुराम बावकर** (दोनिवडे) : मुल्ला–मौलवींना व धर्मांध मुस्लिम समाजाला उघडउघड सामोरे जाऊन नवीन मते प्रतिपादन करताना आपल्याला जीवाची भीती वाटत नाही?

– भीती वाटली असती तर मी हे काम केले असते असे आपल्याला वाटते काय?






साहित्य
जीवनगौरव

# अरुण साधू

**संवादक :** आल्हाद गोडबोले

मराठी व इंग्रजी वृत्तपत्रांतून पत्रकार-संपादक या नात्याने
सतत पुरोगामी विचारांचा प्रचार-प्रसार करणे आणि
कथा व कादंबऱ्या या माध्यमांतून मराठीतील
ललित साहित्यात काही मूलभूत व महत्त्वाच्या विषयांना
हात घालणे हे काम अरुण साधू यांनी
मागील जवळपास ५० वर्षे केले आहे. मराठी भाषेच्या संदर्भात
व महाराष्ट्र राज्याच्या संदर्भात त्यांची अशी ठोस भूमिका आहे
आणि महानगरी विश्व कादंबऱ्याच्या माध्यमांतून रेखाटणे
व मराठीत राजकीय कादंबऱ्यांचे दालन खुले करणे,
यासाठी हा जीवनगौरव सन्मान आहे.



Ph. : 022 26592528

जन्मजात मिळालेले नाव-आडनाव आणि व्यक्तिमत्त्व यांत साधर्म्य क्वचित आढळते. पण साहित्याच्या क्षितिजावर अर्धशतकापूर्वी उगवलेल्या अरुण साधू नावाच्या साधुपुरुषाने आपल्या कर्तृत्त्वाने आणि लिखाणातून ते सार्थ केले आहे. मराठी आणि इंग्लिश या दोन्ही भाषांमध्ये नावाजलेले ज्येष्ठ अभ्यासू पत्रकार, साहित्य संमेलनाचे माजी अध्यक्ष, प्रसिद्ध कादंबरीकार ही त्यांची ठळकपणाने ओळख; पण कादंबरीखेरीज कथा-पटकथा, नाटक-एकांकिका, अनुवाद, समकालीन इतिहास आणि चरित्रलेखन असे चतुरस्त्र लिखाण त्यांच्या नावावर आहे. 'मुंबई दिनांक' या पहिल्याच कादंबरीने आणि 'सिंहासन' चित्रपटाने त्यांना 'वेगळ्या वाटेवरचा राजकीय कादंबरीकार' अशी ओळख मिळाली. पण ती अपुरी ठरावी, असे वास्तववादी आणि वैश्विक भान असलेले लिखाण पुढील अर्धशतकात करून मराठी सारस्वतातील आपले स्थान त्यांनी अढळ केले. समकालीन राजकीय जीवनातील जीवघेणी सत्तास्पर्धा, सत्तेच्या पटावरील सोंगट्या खेळविताना केले जाणारे विधिनिषेधशून्य डावपेच आणि हे सारे चालू असताना जगण्याच्या धडपडीत रोज बळी जाणारा सामान्य माणूस ह्यांचे जिवंत आणि मर्मभेदक चित्रण साधूंनी या दोन कादंबऱ्यांत केलेले आहे.

मराठी कथा-कादंबरी स्वप्नरंजनांत गुरफटलेल्या अवस्थेत असताना विशीतील या तरुणाने आसपासचे सर्वसामान्य माणसाचे जगणे शिक्क्याप्रमाणे तटस्थपणे टिपून घेतले आणि संवेदनेच्या शाईसह ते साहित्यातून उमटवले. त्यातील वास्तवाची धार तत्कालीन साहित्यविश्वाला खडबडून जागे करणारी होती. त्यांच्या दीर्घकाळच्या पत्रकारितेतील अनेक अनुभव प्रभावी साहित्यकृतींचा आकार धारण करून त्यांच्या कादंबऱ्यांतून प्रकटले. बूटपॉलिशवाल्या शेकडो पोरांचे प्रतिनिधित्व करणारा त्यांच्या कथेतील झिपऱ्या असो, कादंबऱ्यांतील राजकारणी असो, अथवा दिगू टिपणीससारखा पत्रकार असो; बातमीदारी करता-करता आपल्याला असे लिहिता आले पाहिजे, असा एक आदर्श साधूंनी पुढील पिढ्यांसाठी घालून दिला. मात्र लौकिक लाभूनही त्यांची लेखणी साच्यात अडकली नाही. फिडेल कॅस्ट्रोचे गव्हेरा यांच्यासारख्या बंडखोर जागतिक नेत्यांची साधूंना भुरळ पडली, तसेच सहकार चळवळीचे अध्वर्यू विठ्ठलराव विखे, द्रष्टे नेते यशवंतराव चव्हाण, घटनाकार डॉ.बाबासाहेब आंबेडकर अशा- स्वतःला भावलेल्या- व्यक्तिरेखा त्यांनी चरित्र-पटकथादि फॉर्ममध्ये शब्दबद्ध केल्या. विक्रम सेठच्या 'अ सुटेबल बॉय'चा अनुवाद केला आणि 'त्रिशंकू' ही चिंतनगर्भ तसेच 'मुखवटा' ही सर्वांगीण महाकादंबरी लिहिली.

दर्जाशी तडजोड न करता सातत्यपूर्ण लिखाण केलेल्या अरुण साधू यांना महाराष्ट्र फाउंडेशनचा जीवनगौरव पुरस्कार लाभतो आहे, ही मराठी साहित्यरसिकांच्या दृष्टीने आनंदाची बाब आहे.

# जे 'अ-क्षर' असेल, ते टिकणारच!

वृत्तपत्रांनी दखल घेतली तरच साहित्य जिवंत राहते, अशा भ्रमात आपण राहू नये. ज्ञानेश्वर, तुकाराम, कालिदास, होमर, शेक्सपिअर आदी कवी, लेखक, नाटककार आपल्या साहित्याविषयी लिहून यायला वृत्तपत्रेच नाहीत म्हणून रडत बसले नव्हते. साहित्य हे त्यांच्या अंत:शक्तीवर जिवंत राहते व विकसित होते. आणखी एक गोष्ट लक्षात घेतली पाहिजे. साहित्यनिर्मितीत मंदी आली आहे असे मराठीत तरी दिसत नाही. नियतकालिकांची आणि साहित्य प्रकाशनांची संख्या दरसाल वाढतेच आहे. कवी, कादंबरीकार, नाटककार यांचीही संख्या भरमसाट वाढते आहे. मला हे चित्र आशादायक वाटते.





**प्रश्न –** एकीकडे स्वच्छंदवाद, दुसरीकडे कलेसाठी कला की जीवनासाठी– असे वाद झडत असतानाच्या काळात आपण कथा लिहायला सुरुवात केलीत, ती थेट वास्तववादी. वास्तवाचं हे प्रखर भान कुठून, कसं लिखाणात आलं?

– माझं वाचन काही फार विस्तृत नाही; पण किशोरावस्थेत मराठी साहित्याची ओळख झाली ती हरी नारायण आपटे, साने गुरुजी, नाथमाधव, बाबूराव अर्नाळकर इत्यादिकांची पुस्तकं; आणि चांदोबा, नंतर अधे-मधे थोडे खांडेकर-फडके आदी वाचून. पण ते वाचताना 'हे असं नाही, असं नसतं' असं वाटायचं. आसपास दिसायचं तेही कथा-कादंबऱ्यांसारखं नसायचं. शाळेत निबंध लिहिण्यासाठी शिक्षक विषय द्यायचे तेव्हा सांगायचे, या विषयावर मनात जे येतं ते जसंच्या तसं लिहा. कोणाची नक्कल करू नका. ते मनात ठसलं होतं. त्यातून बाहेर जगात जे आणि जसं दिसतं ते मांडण्याची भूमिका घडत गेली.

**प्रश्न –** आपल्या लिखाणावर कोणते प्रभाव आहेत?

– घरात महर्षी व्यास, वाल्मीकी वगैरे होते, ते लहानपणी वाचले. तसे इंग्रजीतील डिकन्स, टॉलस्टॉय, डोस्टोवस्की, अलेक्झांडर पुष्कीन, आर्थर कॉनन डायल, सार्त्र, कामू आदी बहुधा पूर्ण न समजता थोडे-थोडे वाचले होते. पण पहिल्या कादंबरीवर– 'मुंबई दिनांक'वरदेखील यातल्या कुणाचा प्रभाव होता, असं मी म्हणणार नाही.

**प्रश्न –** 'मुंबई दिनांक'चा फॉर्म कसा ठरवलात?

– फॉर्मचा जाणीवपूर्वक विचार करण्याची आवश्यकता वाटली नाही. फॉर्मच्या प्रयोगाने वाचक दुरावतात. जसे सुचते तसे लिहायचे. ओढून-ताणून फॉर्मचा आविर्भाव घेतला की कृत्रिमता येते. 'मुंबई दिनांक' अशी सहजच कागदावर उतरली.

**प्रश्न –** कलावाद व जीवनवाद यांच्यापेक्षा वास्तववाद आपल्या लिखाणाची प्रेरणा ठरला, असे वाटते का?

– वास्तववाद मला अधिक भावला. जीवनेच्छा ही आदिम प्रेरणा आहे. अगदी अमिबापासून ते माणसापर्यंत ही प्रेरणा जबरदस्त असते. वंशसातत्याची सनातन ओढ... तिचं मला कायमच आश्चर्य आणि आकर्षण वाटत आलं आहे. त्यामुळे वास्तव कितीही भयाण असलं तरी जगण्याची धडपड चालूच असते, हे टिपण्याचा प्रयत्न केला.

**प्रश्न –** अरुण साधू म्हटलं की, 'मुंबई दिनांक' आणि 'सिंहासन'चा उल्लेख होतो. किंबहुना, राजकीय कादंबरीचा मानदंड त्यांनी मराठीत घातला, असं म्हटलं जातं. काय कारण?

– मराठी माणसांचा महाराष्ट्र अस्तित्वात आल्यावर, मराठी वाचनसंस्कृती ऐन भरात असताना 'मुंबई दिनांक', 'सिंहासन' या कादंबऱ्या प्रसिद्ध झाल्या. त्यांचे विषय मराठी कादंबरीसाठी नवे होते आणि आज एवढ्या वर्षांनंतर महाराष्ट्रातलं राजकारणही त्याच वळणांनी जाताना दिसतं... वाचकांना ते भिडत असावं.

**प्रश्न –** 'बहिष्कृत', 'त्रिशंकू', 'शोधयात्रा' या तुमच्या पुढच्या कादंबऱ्या 'नाही रे' वर्गाचं जगणं चितारणाऱ्या. 'त्रिशंकू' तर तुम्हाला स्वतःला भावलेली. पण तुम्हाला 'त्रिशंकू'कार म्हटलं गेलं नाही...

– त्रिशंकू १९८० मध्ये प्रसिद्ध झाली, तेव्हा अनेकांना आवडली. तिच्यावर हिंदीत लेख छापून आले. पण एकाही मराठी वृत्तपत्राने त्यावर लिहिले नाही. एकही समीक्षात्मक लिखाण प्रसिद्ध झालं नाही. मराठी समीक्षकांकडूनच तिची अशी उपेक्षा झाली, तिथे आणखी काय अपेक्षा ठेवणार?

**प्रश्न –** 'मुखवटा' ही त्यानंतर १८-२० वर्षांनी आलेली; त्रिशंकूप्रमाणेच श्रेष्ठ म्हणावी अशी. एका अर्थानं सामाजिक, खूप मोठा पट असलेली, तुम्हाला वेगळी ओळख देणारी महाकादंबरी. पण तुम्हाला 'मुखवटा'कार असंही म्हटलं जात नाही...

– 'मुखवटा'बाबतीतही तेच घडलं. कादंबरी १९९९ मध्ये प्रसिद्ध झाली, तेव्हा प्रतिष्ठित नियतकालिकांनी तिच्याकडे साफ दुर्लक्ष केलं. जाणकार समीक्षकांनी तर तेव्हा आणि नंतरही कधी दखल घेतली नाही. तिची पुढे चार-पाच पुनर्मुद्रणे झाली. पण इतर कादंबऱ्यांइतकी ती चर्चिली गेली नाही, हे खरं. 'मुखवटा'ला वाचकांचा प्रतिसाद मात्र समाधानकारक होता. पत्रे येत ती कार्डावर किंवा इनलँण्डवर नव्हे, तर ८-१० पानी. इंटरनेटच्या प्रसारानंतर हे प्रमाण वाढलं. पण मला वाटतं, विसाव्या शतकाअखेरीस संगणकीय-डिजिटल क्रांतीचा बऱ्यापैकी प्रसार होऊन तरुणांचं वाचनावरून लक्ष उडू लागलं होतं. त्याचं धक्का देणारं प्रत्यंतर त्या वेळी आलं.

**प्रश्न –** 'मुखवटा'मध्ये आत्मकथन किती आहे?

– वाचकांना कथाविषयाला लेखकाच्या आत्मचरित्राशी जोडण्याची सवय असते. मला ते पटत नाही. प्रत्यक्ष अनुभव ही दुय्यम बाब आहे. हे खरं की, 'मुखवटा'चं मुख्य कथाविश्व ज्या भौगोलिक प्रदेशात उभं

राहतं, त्या परिसरात माझा जन्म झाला– बालपण गेलं. त्यामुळे प्रतिक्षिप्त प्रेरणेतून माझ्याकडून तो परिसर निवडला गेला असावा. पण तपशील भरण्यासाठी मला बऱ्यापैकी अभ्यास करावा लागला.

**प्रश्न –** तुमच्या दृष्टीनं 'मुखवटा'चं वेगळेपण काय?

– 'मुखवटा' ही बहुपदरी आणि नात्यांची, जिव्हाळ्याच्या संबंधांची गुंतागुंत असलेली महाकादंबरी (पृ.५५४) आहे. वंशसातत्याची सनातन ओढ हा तिचा गाभा आहे. शिवाय किती तरी ताणेबाणे. जातिकारण, समाजकारण, राजकारण, संस्कृतिकारण, धर्मकारण यांचं विलक्षण रसायन, गुंतवळे, कालौघाची वाढलेली गती, गावाचा बदलता भूगोल व वातावरण, सुधारणांमुळे वेगाने बदलणारं गाव, बदलती माणसं आणि त्यांचे बदलते स्वभाव... असा संथ पण विलक्षण भोवऱ्यांनी घुसळून निघणारा कालौघ. गीतेमध्ये श्रीकृष्णाने नित्यानित्य संसाराला ऊर्ध्वमूल अध:शाखा म्हणजे वर मुळं व खाली फांद्या असलेल्या अश्वत्थ वृक्षाची उपमा दिली, त्याची आठवण देणारा हा विशाल वटवृक्ष. हाच तो अश्वत्थ म्हणजे बदलाच्या भोवऱ्यातील समाज म्हणावा किंवा एक उदाहरण म्हणून अक्षीकरांचं परिवर्तनाच्या झपाट्यात सापडलेलं विस्तीर्ण कूळ म्हणावं...

**प्रश्न –** 'साहित्य अकादमी'ची मोहोर निदान 'मुखवटा'वर उमटायला हवी होती– असं आपल्या चाहत्यांना, साहित्यिकांनाही वाटतं...

– यावर मी काही भाष्य करणार नाही.

**प्रश्न –** आपण आणखी एका महाकादंबरीच्या नोंदी आणि मजकूर १९९१ पासून ठेवत आहात, असं दोन वर्षांपूर्वी वाचलं होतं...?

– हो, ठेवल्या होत्या; पावणेतीनशे–तीनशे पाने लिहूनही झाली होती...

**प्रश्न –** होती, म्हणजे?

– १९९२ ते ९६ या काळात लिहीत होतो. या काळात खूपच झपाट्याने गोष्टी घडत गेल्या. त्या आणि जागतिक घडामोडींसह आपल्या देशांतला अनेक क्षेत्रांतला बदलता माहोल नोंदवत होतो. उदाहरणार्थ– वंशद्वेष, वर्णद्वेष हे सगळं त्यात होतं. अर्थात त्यात माझी विज्ञाननिष्ठता आणि धर्मनिरपेक्षता होती. पण अयोध्येपाठोपाठच्या घटनांनी कादंबरीतील मध्यवर्ती सूत्राला असा काही धक्का बसला की, लिखाणच थांबलं. याच काळात अन्य लेखनाला प्राधान्य दिलं गेलं. उदाहरणार्थ– विखे पाटील, शाहू महाराज यांच्यावरील पुस्तकांचे काम, यशवंतरावांवरील चित्रपटाची पटकथा... शिवाय स्वतःचे आजारपण वगैरे. सन २००१ मध्ये तर मोठीच उलथापालथ झाली. त्या सगळ्या घटना एका झपाट्यात लिहून काढायला हव्या होत्या, ते जमलं नाही. मनाशी ठरवल्याप्रमाणे लिखाण लिहून झालं नाही. मग आपलं लिखाण निरर्थक वाटायला लागलं. हे सारं लिहायलाच हवं का, असं वाटायला लागलं. अखेर एक दिवस तो ड्राफ्ट टाकून दिला...

**प्रश्न –** एका महाकादंबरीचा असा अपमृत्यू तुमच्या चाहत्यांनादेखील रुखरुख वाटायला लावणारा नाही का?

– पाहू, ते बीज आहे अजून मनात...

**प्रश्न –** आपल्या कादंबरीवर 'सिंहासन' चित्रपट आला, तशी 'झिपऱ्या'ही पडद्यावर येणार, अशी बातमी आहे...

– हो, बूटपॉलिश करणाऱ्या मुलांच्या आयुष्यावर लिहिलेली 'झिपऱ्या' ही पहिली कथा पुढे नायक तोच ठेवून मालिकेच्या रूपात साकारली गेली आणि आता लवकरच मोठ्या पडद्यावर ती झळकणार आहे. पुण्यातील निर्माती अश्विनी दरेकर हा चित्रपट काढते आहे.

**प्रश्न –** पटकथाकार म्हणूनही आपण परिचित आहात. 'यशवंतराव चव्हाण : बखर एका वादळाची' या चित्रपटाची पटकथा आपण लिहिलीत. मात्र या चित्रपटास अपेक्षित यश लाभले नाही. काय कारणे असतील?

– या चित्रपटाची निर्मिती स्वतंत्रपणे झाली असती, तर खूप वेगळ्या गोष्टी झाल्या असत्या. यशवंतरावांचे सगळेच आयुष्य– लहानपणापासून ते मृत्यूपर्यंतचे मांडणे अपेक्षित होते. एवढा मोठा पट अडीच–तीन तासांच्या चित्रपटात आणताना खूप गडबड होऊ शकते. मला अधिकार असता तर मी त्यांच्या १९५६ ते १९६२ एवढ्याच काळाची मांडणी केली असती. त्यांच्या कारकिर्दीतील या सर्वोच्च काळाला मी प्राधान्य दिले असते. सर्वाधिक नाट्यमयता या काळात होती.

**प्रश्न –** 'पडघम' वगळता नाट्यलेखनाकडे, एकांकिकांकडे आपण फारसे वळला नाहीत... का?

– खरं तर शाळेमधे स्वत: उत्स्फूर्ततेनं लिहिलेली नाटकं केली, ती त्या वेळच्या प्रेक्षकांना बऱ्यापैकी भावली. एक प्रहसन तर विद्यार्थ्यांनी डोक्यावर घेतलं. त्यामुळे पुढे जाऊन आपण नाटकं लिहू, असा होरा होता. पुण्यात नाटकं पाहिली. पण जात्याच असलेल्या न्यूनगंडामुळे कुठल्या नाट्यसंस्थेशी संपर्क केला नाही. शिवाय त्याच काळात

विद्यापीठात गणिताचा अभ्यास आणि पत्रकारितेचा पेशा या झपाट्यात हे इरादे मनातच राहिले. पुढे जब्बार पटेलांची ओळख झाली. ‘पडघम’चा प्रयोग त्यांच्या थिएटर ॲकॅडमीने असा भव्य-दिव्य केला की, मी चाट पडलो. पण लक्षात आलं की आपण काही शेक्सपिअर नव्हे. शेक्सपिअरच्या संहिता अशा घट्ट असतात की, नाटकात कोणी कितीही स्वातंत्र्य घेतलं तरी आशय बदलता येत नाही.

**प्रश्न –** नाटकापेक्षा कथा-कादंबरीतून व्यक्त होणं अधिक चांगलं वाटतं का?

– कथा-कादंबरीत लेखक आणि वाचक यांच्यात शब्दांखेरीज दुसरं काही माध्यम नसतं. लिहिलेले शब्द फक्त लेखकाचेच असतात. ते कोणी बदलू शकत नाही. त्यांचा तुम्ही काहीही अर्थ काढा, तफावत पडत नाही. कदाचित ही थेट अभिव्यक्ती मला अधिक पसंत पडत असावी. शिवाय आपले कथाविश्व साकारताना आपल्या पात्रांचा स्वभाव, त्यांच्या वागण्याचा आलेख यांचे चित्रण आपल्याला अचूक व अलगदपणे चितारता येऊ शकते...

**प्रश्न –** तुम्ही तुमच्या काही कथांचे इंग्रजीत भाषांतर केले होते, त्याविषयी...

– अमेरिकेत असताना मी ‘बहिष्कृत’चे स्वतःच भाषांतर केले होते. तिथल्या एका प्राध्यापकांनी ते वाचून चांगले असल्याचा अभिप्राय दिला होता. मात्र त्याचा आणखी विस्तार करावा लागेल, अशी सूचनाही केली होती. तीस-चाळीस वर्षांपूर्वी न्यूयॉर्कच्या एका मासिकात दोन कथा छापून आल्या होत्या. तेथील संपादिकेनं ‘आणखी कथा द्या’, असे कळवले होते. प्रसिद्ध झालेल्या कथांपैकी एक झिपऱ्यावरची आणि दुसरी झोपडपट्टीतल्या विश्वाशी संबंधित होती. तिसरी कथा पाठवली ती शहरी मानसिकतेशी निगडित होती. त्यांनी सांगितले की, ‘आमच्याकडे अशा मध्यमवर्गीय, शहरी जाणिवेवरच्या कथा पुष्कळ असतात. आम्हाला शोषितांची, वंचितांची, दुःख-दारिद्र्याची कथा हवी आहे.’ कदाचित अमेरिकेत आणि युरोपात त्यांना या भारताचं चित्रण-वर्णन करण्याची गरज भासत असावी.

**प्रश्न –** गद्यलेखनातली आपली तटस्थ, कठोर लेखनशैली आपल्याला कोरडीही वाटते. कवितेला ती पोषक नाही, असे वाटते का? की आपल्यातील संवेदनशील मन काहीशा तटस्थ कठोरपणे दूर ठेवण्यासाठी कवितेकडे पाठ फिरवली?

– शक्य आहे... कविता लिहिल्याच नाहीत, असं नाही. पूर्वी एक समज होता की कविता ही भावुक, हळवी वगैरे असायला हवी. खरं तर तसं काही नसतं. दहावीत हस्तलिखितासाठी ‘गीतांजली’तल्या एका कवितेचा अनुवाद मी शार्दुलविक्रीडितमध्ये केला होता. माझे मित्र माझ्या कविता त्यांच्या म्हणून संमेलनांत वाचायचे... आणि माझी लेखनशैली कठोर असली तरी माझ्या लिखाणातील काही वर्णने काव्यमय आहेत. तटस्थता असली तरी त्या-त्या पात्रांच्या दृष्टीने आवश्यक ते तरल भाव लिखाणात आलेले आहेत.

**प्रश्न –** उदाहरणार्थ?

– ‘मुखवटा’मधील कविता मीच लिहिल्या आहेत.

**प्रश्न –** तरीपण ‘अ सूटेबल बॉय’मधल्या ‘अमित’च्या कवितांचा अनुवाद अरुण साधू नावाच्या ‘कवी’ने केल्याचा आनंद मराठी रसिकांना मिळाला होता. हा कवी पन्नास वर्षं दडूनच राहिला...

– असं काही नाही. ‘त्रिशंकू’मध्येही माझ्या पुष्कळ कविता आहेत.

**प्रश्न –** आज ‘मुखवटा’ वाचताना काय वाटते?

– स्वतःची पुस्तकं वाचणं क्लेशकारक. सुरुवातीला उल्लेखलेल्या गाजलेल्या कादंबऱ्या कधी कामासाठी चाळल्यास त्रास होतो. ‘मुखवटा’चं तसं नाही. ‘मुखवटा’ चाळली की, ‘अहं’ सुखावतो. आपल्या लिखाणावर प्रसन्न होण्याची संधी क्वचितच लाभते. ‘मुखवटा’सारखी कादंबरी हातून लिहून झाली याचं समाधानयुक्त आश्चर्य वाटतं. असं क्वचित होतं. ते टिकेल, अशी खात्री वाटते.

**प्रश्न –** आज मराठीत उदंड साहित्य प्रकाशित होते आहे. पण त्यातील किती टिकेल?

– जे ‘अ-क्षर’ असेल, ते अक्षय राहणार; टिकणारच!

**प्रश्न –** पण आता वर्तमानपत्रेसुद्धा नामशेष होण्याच्या मार्गावर आहेत; असे असताना...

– वृत्तपत्रे २००-२५० वर्षांपूर्वी निर्माण झाली. वृत्तपत्रांच्या जन्माआधीपासून शेकडो वर्षे साहित्य आहे आणि वृत्तपत्रे यदाकदाचित मृत झाली तरीही त्यानंतर ते टिकणार आहे. वृत्तपत्रांनी दखल घेतली तरच साहित्य जिवंत राहते, अशा भ्रमात आपण राहू नये. ज्ञानेश्वर, तुकाराम, कालिदास, होमर, शेक्सपिअर आदी कवी, लेखक, नाटककार आपल्या साहित्याविषयी लिहून यायला वृत्तपत्रेच नाहीत म्हणून रडत बसले नव्हते. साहित्य हे त्यांच्या अंतःशक्तीवर जिवंत राहते व विकसित होते.

आणखी एक गोष्ट लक्षात घेतली पाहिजे. साहित्यनिर्मितीत मंदी आली आहे असे मराठीत तरी दिसत नाही. नियतकालिकांची आणि साहित्य प्रकाशनांची संख्या दरसाल वाढतेच आहे. कवी, कादंबरीकार, नाटककार यांचीही संख्या भरमसाट वाढते आहे. मला हे चित्र आशादायक वाटते.

**प्रश्न –** मूळचे विदर्भातले असूनही आपली भूमिका स्वतंत्र विदर्भाच्या विरोधात का?

– विदर्भातील जनतेने सार्वमताने स्वतंत्र विदर्भ मिळवला, तर आपण विरोध करू शकत नाही. पण त्यानंतरच्या फार तर दोन-तीन निवडणुका होईपर्यंतच मराठीपण थोडंफार दिसेल. मग उत्तर प्रदेशी किंवा अ-मराठी नेताच तिथला मुख्यमंत्री होईल. मराठी संपेल. हिंदीचा प्रभाव वाढेल. आत्ताही वाढतो आहे. त्यामुळे मराठीपण टिकवून ठेवायचे असेल, तर विदर्भ महाराष्ट्रातच राहायला पाहिजे.

**प्रश्न –** मराठी भाषा टिकेल का पण?

– इतिहासाचार्य वि.का. राजवाडे यांनी ७५ वर्षांपूर्वी लिहून ठेवलं होतं की, इंग्रजी वापरण्याचा सोस मराठीच्या मुळावर येऊन भाषा नष्ट होईल. तो दिवस जवळ आला आहे आणि तो वृत्तपत्रांनी आणला आहे. भाषेचे प्रमाणरूप आणि दर्जा हे त्या भाषेतल्या प्रसारमाध्यमांतून घडत असते. संस्कृतीला वळणही माध्यमे देत असतात. हे भान आता सुटत चालले आहे.

**प्रश्न –** तुमच्या लिखाणात प्रखर वास्तववाद आणि वैश्विक भान ही वैशिष्ट्ये ठळकपणानं येतात. मग मराठीबाबत अशी निराशा...

– इथंही वास्तव पाहायला हवं. आज संवाद साधताना, शहरी भागात एकमेकांशी बोलताना आपण मराठी भाषक आहोत हे विसरून हिंदी किंवा इंग्रजी भाषेतून संवाद साधतो. हेच लोण आता ग्रामीण भागातही वाढत आहे. इंग्रजी भाषा आवश्यक असली तरी आपली मातृभाषा आपण हरवत चाललो आहोत. आपल्या राज्यभाषेला अभिजात मापदंड मिळण्यासाठी ती अंगीकारणं तितकंच जरुरीचं आहे. तसंच मराठीचा ज्ञानभाषा म्हणून विकास करण्याची गरज आहे. मराठीच्या विकासासाठी स्वतंत्र कोशनिर्मिती करणारी संस्था उभी करावी लागेल. या संस्थेचं कार्य सातत्याने सुरू राहणं आणि कोशवाङ्मयात सातत्याने आवश्यक बदल करणं महत्त्वाचं आहे.

**प्रश्न –** ते सरकारी पातळीवर झालं...

– मराठीच्या विकासासाठी केवळ शासनस्तरावर प्रयत्न पुरेसे ठरणार नाहीत, तर आपली सर्वांचीच मानसिकता बदलली पाहिजे. आपली हृदयाची भाषा मराठी आहे, हे विसरता कामा नये. पण नव्या पिढीला याची जाणीव नाही. आजच्या डिजिटल क्रांतीने आपण खूप बदलत चाललो आहोत. जगात अनेक देशांना परस्परसंवादासाठी इंग्रजी भाषेशिवाय पर्याय नाही, हे जरी खरे असले; तरी आपण संकुचित होऊन आपल्याच भाषेला दुरावत चाललो आहोत. यामुळे आपली भाषाच नव्हे तर माणूसपणही हिरावले जाईल, असे वाटते.

**प्रश्न –** साहित्यसेवेचे अर्धशतक ओलांडल्यानंतर 'महाराष्ट्र फाउंडेशन'कडून मानाचा जीवनगौरव पुरस्कार लाभत असताना काही राहून गेल्याची भावनाही मनात येत असेल...?

– काही कादंबऱ्या लिहायच्या होत्या, त्या राहून गेल्या.

**प्रश्न –** कृतार्थता आणि खंत यांची काही उदाहरणे...

– मला जे लिहावंसं वाटलं, ते मी लिहिलं. मात्र कामाच्या धबडग्यात शाहू महाराजांवर कादंबरी लिहायची राहून गेली. पत्रकारिता सोडली ती लेखनासाठीच. पण पत्रकारिता सोडल्यानंतरही मी माझे आवडते विषय लिहिले– 'ड्रॅगन जागा झाल्यावर' आणि 'तिसरी क्रांती'. बंडखोरपणाचं मला स्वभावतःच आकर्षण. बंडखोरपणा पाहिजेच अंगात. शिवाय ज्या कादंबरीला सुरुवात केली होती, ती समूहाची कादंबरी होती. यशवंतरावांचे चरित्र तीन-चार वर्षे सविस्तर संशोधन करून लिहायचे होते. त्याची आखणीही केली होती. पण प्रत्यक्षात काही घडले नाही. पुढे मी बाकीच्या कामांत गुंतलो. माझ्या दृष्टीने जे चांगले लिखाण होते, ते लोकांपर्यंत पोहोचले, स्वीकारले गेले याचे समाधान आहे.

**प्रश्न –** तसेच अजून काही लिहिण्याची उर्मी-उमेदही असेलच... सध्या काय लिहिताय? रसिकांनी प्रतीक्षा करावी असे काही...

– काही छोट्या कथा लिहिल्या आहेत. ज्या महाकादंबरीची बीजे मनात होती आणि ती तेव्हा पूर्ण झाली नाही... पण ते सूत्र अधूनमधून स्फुरतं. मग ते जुने संदर्भ पुन्हा जुळवतो. लिहितो, काही नोंदी संगणकावरही आहेत... तर, असो.

(शब्दांकन : राधिका कुंटे)

**आल्हाद गोडबोले**
alhadgodbole@gmail.com



# डॉ.नरेंद्र दाभोलकर स्मृति पुरस्कार
## **अतुल पेठे**

atulpethe50@gmail.com
Mob. : 9422319717

**संवादक :** समीर शिपूरकर

नाटकाच्या माध्यमातून एखादा कलाकार किती विषयांना हात घालू शकतो, किती प्रकारे विषयांची मांडणी करू शकतो, प्रेक्षक-श्रोत्यांच्या मनात किती खोल घुसू शकतो, हे समजून घ्यायचे असेल तर अतुल पेठे यांची चार-दोन नाटके पाहिली किंवा चार-दोन भेटीतील संवाद-भाषणे ऐकली तरी पुरेसे आहे. सर्जनशील व समाजसन्मुख जगणे कसे असते, हे अतुल पेठे यांच्या व्यक्तिमत्वात दिसते. मागील २५ वर्षे कलेच्या माध्यमातून सामाजिक जीवनातील हस्तक्षेप हा त्यांच्या विचारांचा व कार्याचा गाभा राहिला आहे. सामाजिक बदलांना गती देण्यासाठी कलावंत लोक, काही वेळा कार्यकर्त्यांपेक्षाही परिणामकारक भूमिका बजावत असतात, हे दाखवण्यासाठी हा पुरस्कार आहे..



दीर्घकाळ सकस काम करणारा प्रयोगशील, जीवनवादी नाट्यकर्मी ही अतुल पेठेची प्रमुख ओळख आहे. पण अभिनय, माहितीपट निर्मिती, छायाचित्रण, लेखन, सामाजिक चळवळींमधे सहभाग अशा विविध गोष्टी त्याच्या व्यक्तिमत्त्वाच्या अंगभूत भाग आहेत.

धरणाच्या दरवाजातून शांतपणे पाणी येत असतं, पण त्याच्यामागं असलेल्या पाण्याचा प्रचंड रेटा असतो. असंच काहीसं अतुलचं आहे. त्याच्या प्रत्येक कृतीमागं त्याच्या आत असलेल्या भावभावनांचा प्रचंड रेटा असतो. आपली अभिव्यक्ती सकस होऊ द्यायची आणि त्याचवेळी हा रेटासुद्धा सहन करत राहायचं, असा समतोल गाठायचा त्याचा सतत प्रयत्न सुरू असतो. आपलं जगणं आणि आपली कला वेगवेगळं न मानणारे काही मोजके लोक आहेत, त्यापैकी अतुल एक आहे.

गेल्या तीसेक वर्षांच्या काळात अतुलनं कोणकोणती कामं केली याकडं नुसती नजर टाकली तरी आश्चर्य वाटेल. क्षितिज, ऐसपैस सोयीनं बैस, वेटिंग फॉर गोदो, मामक : पाण्डवाश्चैव, शीतयुद्ध सदानंद, प्रेमाची गोष्ट, ठोंब्या, गोळायुग, उजळल्या दिशा, सूर्य पाहिलेला माणूस, आनंदओवरी, चौक, मी माझ्याशी, दलपतसिंग येती गावा, सत्यशोधक, रिंगणनाट्य हे नाट्यप्रकार त्यानं हाताळले. नाटककार सतीश आळेकर, तेंडुलकर आणि हिंसा– : काल आणि आज, बहिणाई, कचराकोंडी, अशोक केळकर, के.आर.दाते –: ऊर्जेच्या शोधवाटा, डिरा, सेझ, गावगुंफण असे सकस माहितीपट त्यानं दिग्दर्शित केले, त्यांचं छायाचित्रण स्वतः केलं. अरुण कोलटकरांच्या कवितांचं सादरीकरण केलं. दृष्टिहीन लोकांसाठी मराठीतली दहा नाटकं त्यानं ब्रेल लिपीमधे छापली. आकाशवाणीवर ‘कोसला’ या कादंबरीचं नाट्यरूपांतर केलं. आरोग्यसंवाद शिबिरांमधून विविध थरातल्या लोकांना आरोग्यभान आणि आत्मभान देता येईल याचे प्रयत्न केले. अलीकडच्या काळात ‘तर्काच्या खुंटीवरून निसटलेलं रहस्य’ या संहितेचं नाट्यवाचन केलं. सिनेमा, नाटक, शॉर्टफिल्म्स अशा अनेक माध्यमांमधे अभिनेता म्हणून काम केलं. मनात धुमसत असलेल्या अनेक प्रश्नांना, विचारांना वाट करून देणारे अनेक लेख लिहिले. महाराष्ट्रात, भारतात असलेलं वैचारिक दारिद्र्य, उदासीनता, बेफिकिरी आणि नाट्य करताना त्यामुळं वाट्याला येणारे भोग मांडणारा ‘संडास संस्कृती’ हा लेख त्याच्या लेखनाचा उत्तम नमुना आहे. आत्यंतिक चीड आणि परिस्थितीचा हतबल स्वीकार, आणि तरीसुद्धा बदल घडवण्याची इच्छा या सगळ्यांतून या लेखाची भाषा तयार झालीय.

नाटक हे लोकांसाठी असतं आणि ते लोकांपर्यंत पोचलंच पाहिजे, या प्रेरणेनं अतुलनं आपली नाटकं महाराष्ट्रभर आणि इतरत्र कशी नेता येतील याची वेगळीच पद्धत तयार केली. कमी खर्चात, किमान खर्च भरून निघेल अशा पद्धतीनं दौरे आखण्याचं अर्थतंत्र त्यानं आत्मसात केलं. कलेचं बेट न बनवता समाजाशी, त्यातल्या घडामोडींशी आणि विचारप्रवाहांशी जोडून घेणं त्यानं महत्त्वाचं मानलं. नाटकांच्या प्रयोगांमधून विविध

## आयुष्याला अर्थ आपणच देऊ शकतो

पुढे मग श्याम मनोहर आणि मकरंद साठे हे दोन लेखक जेव्हा माझ्या आयुष्यात आले, तेव्हा माझ्या समकालीन संवेदना अधिक विस्तृत पावल्या, असं मी म्हणेन. अर्थात, एकेकाळी माझ्या अगदी सुरुवातीच्या टप्प्यावर जीवनात असणाऱ्या निरर्थकतेची जी अनुभूती मला जाणवली होती, ती नंतरच्या टप्प्यावर मात्र फार कधी जाणवली नाही. आयुष्याला अर्थ आपणच देऊ शकतो, याविषयीच्या माझ्या काही ठाम भूमिका लोकांमुळे, घटनांमुळे, नाटकांमुळे, साहित्यामुळे आणि जगण्यामुळे पुढच्या काळात निश्चितच प्रज्वलित होत गेल्या, असं मी म्हणेन.




सामाजिक चळवळींसाठी वेळोवेळी निधी उभा केला. नाटकाचे दौरे चालू असतानाच अनेक महत्त्वाची पुस्तकं तो लोकांपर्यंत पोचवायचा प्रयत्न करत आला.

नाटक हे अतुलच्या जगण्याच्या केंद्रस्थानी आहे. अलीकडच्या काळात माणसं वेगवेगळ्या भुलभुलैय्यांमधे अडकत चालली आहेत आणि त्यामुळं नाटक टिकणं अवघड होत चाललंय. कलाकार, अभिनेते सगळ्यांचाच पोच कमी होत चाललाय. अशावेळी नाटक कसं टिकवायचं, वाढवायचं या विचारानं अतुल पछाडला आहे. ठराविक वर्तुळाबाहेर नाटक न्यायचं तर ते आणखी सोपं, आणखी कमी खर्चाचं, आणखी कमी अवडंबर असणारं असलं पाहिजे हे त्याला जाणवत आहे. डॉ.नरेंद्र दाभोलकरांच्या खुनानंतर त्यानं जे रिंगणनाट्य आखलं, त्यामधे हा विचार त्याला कृतीमधे उतरवता आला. कमी खर्च, मंचावर कमी वस्तू लागणारं हे नाटक कोणत्याही जागी कोणत्याही काळी चटकन करता येईल असं आहे.

'वेटिंग फॉर गोदो'पासून रिंगणनाट्यापर्यंतचा प्रवास एका वेगळ्या अर्थानं अर्थपूर्ण आहे. ॲब्सर्डिटी समजून घेण्याच्या आणि मांडण्याच्या आधीच्या प्रयत्नापासून आता सगळ्यांनी मिळून केलेलं हे रिंगण, अशी ही प्रतिकात्मक वाटचाल आहे. म्हणजे ॲबसर्डिची जाणीव खोटी मानायचं कारण नाही. पण इथल्या लोकांना इथली प्रतिकं जास्त कळू शकतात, विचारांनी पुढं नेऊ शकतात. गोल करून एकत्र येणं, संवाद करणं यातून वर-खालीची उतरंड नष्ट होते. पुढं--मागं ही स्पर्धा नष्ट होते. अतुलची सर्वच नाटकं त्याची सामाजिक राजकीय भूमिका मांडत राहणारी असली तरी दलपतसिंग, सत्यशोधक या काळापासून तो इथल्या आव्हानांना आणि दाहकतेला जास्त थेटपणे सामोरं गेलाय असं जाणवतं. इथली विषमता, इथलं जातवास्तव ही वस्तुस्थिती कशा प्रकारे स्वीकारायची, हा पेच नेहमीच असतो.

अतुलला समजावून घ्यायचं तर नुसती त्याची नाटकं किंवा पूर्ण झालेली कामं बघून चालणार नाही. दोन नाटकांच्या मधल्या पोकळीत त्याची जी तगमग चालू असते, त्यातूनही तो कळत असतो. फॉर्मबाबत परत-परत त्याच वाटांवरून जाण्याचा त्याला कंटाळा येतो. त्यामुळं तो सतत जास्त असुरक्षित गोष्टींच्या शोधात असतो.

सॉक्रेटिसची नैतिकता समजावून घेणं, गोदोकडून निरर्थकता समजावून घेणं, चौकातली व्यामिश्रता समजावून घेणं, कान्होबाचं देवाशी असलेलं भांडण समजावून घेणं, पांडुरंग सांगवीकरचा राग समजावून घेणं, के.आर.दात्यांची ऊर्जा समजावून घेणं, आरोग्यसंवादात शरीरामार्फत मन समजावून घेणं, श्री.अ.दाभोलकरांकडून आंतरपीकपालट समजावून घेणं, विजय तेंडुलकरांचं लखलखीत असणं समजावून घेणं, बहिणाबाईला वाकून नमस्कार करणं, अशोक केळकरांच्या विद्वत्तेला सलाम करणं, सतीश आळेकरांच्या तिरकसपणात सामील होणं आणि डॉ.नरेंद्र दाभोलकर असताना आणि नसताना त्यांची विवेकवादी भूमिका समजावून घेणं या सर्व अतुलच्या जगणं समजावून घेण्याच्या पद्धती आहेत. आणि अशा अनेक दृष्टिकोनांनी मिळून समष्टी बनते, अशी त्याची धारणा आहे. जिथं शक्य आहे तिथं सामूहिक कृती, जिथं आवश्यक आहे तिथं एकट्यानंच कृती अशा मिळेल त्या मार्गानं तो अभिव्यक्त होत असतो. म्हणूनच 'प्रोटेस्ट' नावाचं त्याचं पंधरा मिनिटांचं निःशब्द नाटक ही टोकदार अभिव्यक्तीसुद्धा निर्माण होऊ शकते. जगण्याचे विविध आयाम एकत्र करत, विविध कलांचा एकत्रित विचार करत, पुस्तकांबरोबर माणसांना वाचत, आपल्या चुकांची कबुली देत, मर्यादांचा स्वीकार करत तो आपली सामाजिक-राजकीय भूमिका वेगवेगळ्या माध्यमांचा उपयोग करत सतत मांडत राहील, याची खात्री त्याच्या आत्तापर्यंतच्या कामाकडं पाहिलं की मिळत राहते.

**प्रश्न :** माझा पहिला प्रश्न थोडा विस्तारित आहे. तुझ्या नाटकांची सुरुवात जेव्हा तू केलीस, तेव्हापासून आत्तापर्यंत जे बदल घडत गेले; त्यांचा आढावा मला यातून अपेक्षित आहे. तुझी सुरुवातीची नाटकं आणि आत्ताची- यांच्यात काय फरक पडलाय, असं तुला वाटतं?... विशेषतः तू नाटकातून सुरुवातीला हाताळत असलेल्या 'ॲब्सर्डिटी'चा प्रवास आता नेमकेपणाकडे झालाय, असं विधान जर मी केलं; तर ते योग्य ठरेल का? म्हणजे या ॲब्सर्डिटीपासून तू फारकत घेतलीयेस की, ती असण्याच्या एका अंतःस्थ जाणिवेसोबतच तू तुझा पुढचा प्रवास केलायस?... आणि या संपूर्ण नाट्यप्रवासात तुझी सामाजिक-राजकीय भूमिकाही बदलत गेली, असं म्हणता येईल का?

– या प्रश्नाचं उत्तर दोन स्तरांवर देता येईल. पहिलं असं, व्यक्तिगत आयुष्य जसजसं पुढे जात असतं तसतशी तुमची नाटकांची आवड-निवडही बदलत जाते. आपली अभिरुची बदलत जाते. आपला दृष्टिकोन बदलत जातो. आपल्याला अधिकाधिक स्पष्टताही येऊ लागलेली असते. थोडक्यात, एका बाजूला जेव्हा तुम्ही काम करत असलेल्या

गोष्टींतून जसा तुमचा अनुभव वाढत असतो, तसं काही ज्ञानही तुमच्या पदरात पडू लागतं. या ज्ञानाला जर एक विशिष्ट दिशा आपण देत गेलो असू, तर हे ज्ञानही एका दिशेने आणि खोलवरचं होत जातं, असा माझा तरी आजवरचा अनुभव आहे.

आत्ता जे विधान तू केलंस की, माझी सुरुवातीची नाटकं ही ॲब्सर्ड होती; ते विधान खरं म्हणता येणार नाही. मी नाटकांची सुरुवात केली, ती बालनाटकांपासून. मुलांच्या भवतालातले प्रश्न, त्यांचं वैचारिक-भावनिक विश्व असे बालनाटकांचे विषय मी त्या वेळी हाताळले. अगदी काही नावंच घ्यायची झाली तर, माझं अगदी सुरुवातीचं 'मैदान हरवलं आहे' या संकल्पनेवरचं नाटक- त्यात मुलांना खेळायला आसपास मैदानं कशी कमी होत चाललीयेत, हा प्रश्न मी हाताळला होता. 'आनंदीगावचा गंमतराव' या नाटकातून मी एक लहान मुलगा चोरांशी कसा लढतो आणि आपलं धैर्य कसं दाखवून देतो, हे उभं केलं होतं. तर, माझी पहिली एकांकिका 'चेस' ही रॅगिंगसारख्या विषयावरची होती. हे सगळे विषय पाहता, माझी नाटकं ॲब्सर्ड होती, असं मला तरी वाटत नाही...

हो, मी 'वेटिंग फॉर गोदो' हेही नाटक त्यानंतर केलं, हे खरंय. या नाटकामुळेच मी ॲब्सर्ड नाटकं करतो, अशी माझी ओळख झाली... पण म्हणून ती माझी ओळख असल्याचं नाही म्हणता येणार. मघाशी मी उल्लेखलेल्या बालनाट्यांच्या सोबतीनेच इतरही काही वेगळ्या विषयांवरची नाटकं मी केलीयेत. मकरंद साठेंची जी नाटकं मी केली, ती बरीचशी सामाजिक-राजकीय धारणा असणारी होती- मग ते 'सूर्य पाहिलेला माणूस' असेल किंवा 'गोळायुग' असेल. ही आजचे प्रश्न व्याकुळतेने मांडणारी नाटकंच तर होती!... त्यामुळे मी आधी फक्तच ॲब्सर्ड नाटकं केली आणि नंतर कधी तरी सामाजिक नाटकांकडे वळलो, असं मला वाटत नाही. ॲब्सर्ड नाटक एका बाजूला अस्तित्वविषयक मांडणी करतं, तर दुसऱ्या बाजूला राजकीय भूमिकासुद्धा मांडत असतं. दुसरं असं की, पहिल्या टप्प्यावर आपण केलेली नाटकं ही बऱ्याचशा प्रमाणात आपल्या व्यक्तिगत आयुष्याशी जोडली गेलेली अशीच असतात. मला आठवतं- मी माझ्या सुरुवातीच्या काळात इतका गोंधळलेलो, घाबरलेलो- किंबहुना न्यूनगंडाने पछाडलेलो होतो की, ज्याचं नाव ते. याचंच एक संपूर्ण प्रतिबिंब माझ्या नाटकांत त्या वेळी दिसत होतं. म्हणजे, नाटकांतून माझा अभिनय किंवा दिग्दर्शन हे फार नंतर सुरू झालं होतं... त्याआधी मी लिहायला लागलो होतो. मी त्या वेळी कविता करायचो. काही छोटी नाटुकली आणि एकांकिकाही लिहायला मी तेव्हा सुरुवात केली होती. त्यातून व्यक्त व्हायचो. त्या वेळी मला रोज कशाचा न कशाचा तरी राग यायचा. भीतीही वाटायची. त्याविषयी व्यक्त होण्याची गरज भासायची. माझ्या लिहिण्यातून मग मी ती भागवायचो.

...एके काळी मी नकारात्मक भावनांनी एवढा पछाडलो गेलो होतो की, आमच्या घरापाशी असलेल्या शनीच्या मारुतीला मी घाबरून रोज दोन-दोनशे फेऱ्यादेखील मारल्या आहेत. वेगवेगळ्या दबावांमुळे मी त्या वेळी अगदी एकटा पडलेलो होतो. अशा काळात कविता आणि साहित्याने मला साथ दिली होती. हेच सगळं प्रतिबिंब माझ्या नाटकांत पडलंय. यानंतरच्या काळात जेव्हा मी सतीश आळेकरांची नाटकं बघितली, तेव्हा त्यांचाही बराच प्रभाव माझ्यावर पडला. यानंतर मात्र काही विशिष्ट कालखंडानंतर माझ्या सामाजिक-राजकीय जाणिवादेखील अधिक प्रखर व्हायला लागल्या, हेही तेवढंच खरं. पुढे मग श्याम मनोहर आणि मकरंद साठे हे दोन लेखक जेव्हा माझ्या आयुष्यात आले, तेव्हा माझ्या समकालीन संवेदना अधिक विस्तृत पावल्या, असं मी म्हणेन. अर्थात, एके काळी माझ्या अगदी सुरुवातीच्या टप्प्यावर जीवनात असणाऱ्या निरर्थकतेची जी अनुभूती मला जाणवली होती, ती नंतरच्या टप्प्यावर मात्र फार कधी जाणवली नाही. आयुष्याला अर्थ आपणच देऊ शकतो, याविषयीच्या माझ्या काही ठाम भूमिका लोकांमुळे, घटनांमुळे, नाटकांमुळे, साहित्यामुळे आणि जगण्यामुळे पुढच्या काळात निश्चितच प्रज्वलित होत गेल्या, असं मी म्हणेन.

**प्रश्न :** एक दिग्दर्शक म्हणून तुझ्या नाटकप्रवासाचं एक योग्य प्रकारे मूल्यमापन, त्याची दर्जेदार समीक्षा आजवर केली गेलीय, असं तुला वाटतं का? तुझ्या वैचारिक प्रवासाची योग्य दखल घेतली गेलीय का?

– खरं उत्तर द्यायचं तर, 'नाही'! माझ्या कामाचं योग्य मूल्यमापन झालेलं नाही. पण, यासोबतीलाच दुसरीकडे- माझ्या आधीच्या पिढीतल्या लोकांच्या तरी कामाचं योग्य मूल्यमापन कुठे झालंय, असाही एक प्रश्न उद्भवतोच. हे पाहता असंही लक्षात येतं की, मराठी समाजात त्या अर्थाने मूल्यमापन करणारे लोकच मुळी अनुपस्थित आहेत.

वृत्तपत्रांबाबत या संदर्भात बोलायचं झाल्यास अशा कलांबाबत लिहिणारे रिपोर्टर्स आहेत, पण समीक्षक

नाहीत. त्यामुळे अलीकडच्या काळात आपणच आपलं अंतर्मुख व्हावं... विचारांत पडावं, असं काही मला तरी आजवर फार कमी वेळा अनुभवायला आलंय.

खरं तर, एखादा दिग्दर्शक जेव्हा काही नाटकं निवडत असतो, तेव्हा ती नाटकं म्हणजे त्याचा जीवनविषयक दृष्टिकोन असतो. हे एकेक नाटक म्हणजे त्याचं फक्त व्यक्तिगत आयुष्य नव्हे; तर त्या आयुष्याला चिकटलेला समाज, त्या आजूबाजूचं राजकारण, आसपासची भौगोलिक परिस्थिती आणि परिसर हा त्याच्यात घट्टपणे, सेंद्रियपणे चिकटलेला असतो. त्यामुळे नाटकं कुठली केली, यावरून तुमचा तत्कालीन समाज कसा होता, प्रश्न कुठले होते; हे लेखांचे खरं तर विषय नक्कीच होऊ शकतात. पण अजून तरी ते माझ्या अनुभवाला आलेलं नाहीये.

मराठी समाजात टीका, समीक्षा, मूल्यमापन, पुनर्मूल्यांकन नावाची गोष्ट आज जवळजवळ अस्तित्वात नाही, याचा खेद वाटतो. व्यक्तिगत पातळीवर मात्र माझे अनेक मित्र आहेत, जे माझ्या कामाचं मूल्यमापन करण्याचा रोखठोक प्रयत्न करतात, हेही तेवढंच खरंय...

**प्रश्न :** ... पण तू स्वतः मात्र मूल्यमापन करण्याचा एक प्रयत्न केलायस. 'तेंडुलकर आणि हिंसा : काल आणि आज' ही तू आणि मकरंद साठेंनी मिळवून बनवलेली तेंडुलकरांवरची डॉक्युमेंटरी फिल्म- हिच्याविषयी मी बोलतोय. याच फिल्मसारखं काही नाटकाच्या संदर्भात तुला करायला आवडेल का?... नाटकातल्या कुणाच्या कामाबाबत तुला असा काही प्रयत्न रस घेऊन करावासा वाटेल का?

– असे खरं तर खूप आहेत. मी असा प्रयत्न आळेकर आणि बहिणाबाई चौधरींविषयी केलाय यापूर्वी. नावं तर कैक घेता येतील. मला सांग, सत्यदेव दुबेंचं काय मूल्यमापन झालं आपल्याकडे? विजया मेहतांचं स्वतःचं लेखन राहू देत; पण त्यांचं अन् त्यांच्या नाटकांचं, त्यांच्या शैलीचं तरी चांगलं मूल्यमापन कुठे झालंय आजवर?... असे बहुतेक लोक कित्येकदा तर अनुल्लेखाने मारले गेले आहेत. त्यांचं मूल्यमापन आवश्यक असूनही होऊच शकलेलं नाही. मला ते करायला आवडेल. पण एकीकडे हे असतानाच, मला त्या-त्या कालखंडातली विशिष्ट नाटकं आणि त्यांचा त्या कालखंडाशी असणारा संबंध उलगडून पाहण्यातही रस आहे. तत्कालीन समाजरचना काय होती, त्या काळात कोण माणसं काय-काय करू पाहत होती, त्याचे समकालीन संदर्भ काय... अशा विषयाला घेऊनही फिल्म करण्याचा माझा मानस आहे. 'रंगभूमीचं रसग्रहण' असं काही करता आलं, तर मला ते आवडेल.

**प्रश्न :** आता मी थेट सध्या तू जे काम करतोयस, त्याच्याकडे येतो. र. धों. कर्वेंच्या सबंध कामासंदर्भात तू 'समाजस्वास्थ्य' म्हणून जे नाटक करायला घेतलंयस, त्याविषयी मला बोलायचंय. समाजातील स्त्री-पुरुषांची लैंगिकता या विषयाला घेऊन तू करत असलेलं हे नाटक, त्या अर्थाने 'रधों'चा क्रांतिकारी विचारच मंचित करणारं असणार आहे. हा विषय आजच्या काळातही तेवढासा चर्चिला जात नाहीच. शंभर वर्षांपूर्वी त्यांनी मांडलेला हा विषय आज नाट्यरूपात पुढे आणावा, असं तुला का वाटलं?...

– खरं तर गेली अनेक वर्षं 'रधों'चे विचार पुढे आणावेत, त्यांवर नाटक करावं, असं माझ्या मनात होतं. शिवाय, कर्वेंशी माझे त्या अर्थाने दोन ते तीन स्तरांवर संबंध आहेत, असं म्हणता येईल... एक म्हणजे, माझ्या आजोबांनी त्या काळी 'समाजस्वास्थ्य' हे मासिक चालावं यासाठी आर्थिक मदत म्हणून जाहिराती मिळवून दिल्या होत्या. कर्वेंच्या सत्तरीच्या सत्कार-समारंभातही माझ्या आजोबांचा पुढाकार होता...

अर्थात, या त्या अर्थाने अगदीच खासगी स्वरूपाच्या संबंधांव्यतिरिक्तदेखील 'रधों'शी माझे वैचारिक दृष्ट्या नातं सांगणारे संबंधही आहेतच. मला स्वतःला 'लैंगिकता' या विषयाला घेऊन इतर कुठल्याही भारतीय तरुणाला पडतील, तसे अनेक प्रश्न माझ्या पौगंडावस्थेत पडलेले असायचे. मात्र, अशा विषयांना घेऊन जिथे जवळपास प्रत्येकच जण अळीमिळी-गुपचिळीचीच भूमिका घेत असतो, त्या आपल्या समाजात अशा प्रश्नांची उत्तरं तुम्हाला कोण अन् कशाला देतंय?... अशा वेळी, यावर थेट काही भूमिका मांडू पाहणारे 'रधों' मला अर्थातच अधिक जवळचे वाटायचे.

...लैंगिकतेप्रति असणाऱ्या आपल्या सामाजिक अज्ञानामुळे लिंग व लिंगभाव यांतला फरक आणि त्याचा समाजावर होणारा परिणाम, याकडे आपण कधीही लक्षच देऊ शकलो नाही. आपली शिक्षणव्यवस्थाही त्यात कमी पडली आहे. आपलं शरीर, आपल्या भावना, त्यासंबंधीचे अनेक गुंतागुंतीचे प्रश्न या सगळ्याच्या उत्तरांचा शोध घेता-घेता एके दिवशी मी 'रधों'पर्यंत येऊन पोचलो... आणि खरं सांगतो; या टप्प्यावर येऊन शब्दशः स्तिमित झालो!

सन १९२० मध्ये 'समाजस्वास्थ्य'मध्ये जे विषय होते, ते आजच्या संदर्भातही तेवढेच प्रस्तुत आहेत, असं

आपल्या लक्षात येईल. पण आपल्या समाजाचं दुर्दैवही असं की, आपण 'रधों'नी मांडलेल्या संततिनियमनाला 'कुटुंबनियोजन' असं सोईस्कर नाव दिलं आणि बायकांच्या संदर्भातील समागम-वैचित्र्याचं जे एक महत्त्वाचं मूल्य कर्वे मांडू पाहत होते, तेच नेमकं आपण बाजूला सारलं. खरं तर, स्त्रियांच्या संदर्भातील लैंगिकतेचा एक प्रखर अन् खणखणीत असा स्त्रीवादी दृष्टिकोन 'रधों' मांडू पाहत होते... पण दुर्दैवाने आपण नेमकं तेच दुर्लक्षित केलं.

प्रखर बुद्धिप्रामाण्य, विवेकी विचार, वैज्ञानिक दृष्टिकोन हे तर 'रधों'च्या साहित्यात जाज्वल्य आहेच; पण या व्यतिरिक्त त्यांच्यात असणारी नवमतवादी दृष्टी हीदेखील तेवढीच महत्त्वाची आहे. त्यांच्याच शब्दांत सांगायचं झालं तर, त्यांचा लढा हा तत्कालीन 'जीर्णमतवादा'विरोधी होता. नवरचना काय असते, समाजातला मोकळेपणा म्हणजे काय, एकमेकांना अवकाश देणं म्हणजे काय- या सगळ्याच्या संदर्भात र.धों. कर्वेंनी जे काही म्हणून ठेवलंय, ते केवळ थक्क करणारं असंच आहे. दुर्दैवाने, महाराष्ट्रातल्या त्या-त्या काळात सोईस्कररीत्या दुर्लक्षिल्या गेलेल्या अनेक थोरांप्रमाणेच कर्वेदेखील त्यांच्या काळात दुर्लक्षिलेच गेले. आम्ही जसं फुले आणि आगरकरांना दुर्लक्षिलं, नेमस्त म्हणत अनेकांचा जसा धिक्कार केला; तसंच 'रधों'चं महत्त्वसुद्धा आम्ही जाणलं नाही, हेच खरं...

**प्रश्न :** नक्कीच. हे नाटक खूप महत्त्वाचं ठरेल, यात शंका नाही. विशेषतः नव्या विचारांच्या सध्याच्या काळात जेव्हा स्त्रीवाद, स्त्री-पुरुष समता यासोबतच स्त्री-पुरुषाव्यतिरिक्तच्या लिंगांनासुद्धा मान्यता मिळण्याच्या मोकळ्या विचारांच्या अलीकडल्या काळात कर्वे नव्या अर्थाने कदाचित आपल्याला उमगू शकतील, अशी आशा करू या... आता मी थोडा मागे जातो. नुकतंच तू 'व्हाईट रॅबिट, रेड रॅबिट' या नावाचं एक नाटक केलंस. पूर्णतः एक नवा आणि वेगळा प्रयोग होता हा. त्यातून तुला काय उलगडलं, हे सांग ना-

- मला स्वतःला वेगवेगळी आव्हानं घ्यायला आवडतं. एक म्हणजे, आपण याआधी जे काही केलंय, ते सगळं पुसून टाकत नव्याने एखादी गोष्ट बिनदिक्कत करून पाहावी, असं मला नेहमीच आवडतं. त्यातच माझी प्रायोगिकता आहे, असं मी समजतो. मला नव्या रचना करता येतील का, मला नव्या शैली आत्मसात करता येतील का- हे मी पाहत असतो. 'व्हाईट रॅबिट...' हे अशाच एका प्रयोगाचा भाग.

इराणमधला लेखक नसीम सोलेमॅनपोर याने लिहिलेलं हे नाटक. यातली खरी गंमत आणि खरं आव्हानही हे की, या नाटकाची संहिता थेट रंगमंचावरच अभिनेत्याच्या हातात दिली जाते. याची कसलीही रंगीत तालीम वगैरे नसते. याला कुणी दिग्दर्शकही नसतो. आपणच आपलं नाटक दिग्दर्शित करायचं आणि वाचता-वाचता ते प्रेक्षकांपुढे मंचावर घडवत जायचं, ही त्यामागची मूळ संकल्पना! एक आव्हान म्हणून मी ते काही महिन्यांपूर्वी स्वीकारलं.

पण खरं सांगतो- सुरुवातीचा काही वेळ मला वाटणारी भीती आणि गोंधळ त्या नाटकाची संहिता वाचता-वाचता दूरच झाला. जगभरात सध्या सुरू असणारा गोंधळ, असहिष्णुता आणि सतत जाणवणारी एक अनामिक घुसमट याचं दर्शन घडवणारी ती संहिता... ती वाचता-वाचता मी तिच्याशी कधी थेट कनेक्ट झालो, हे लक्षातही आलं नाही. या 'परकाया-प्रवेशा'नंतर या नाटकातली उत्स्फूर्तता ही आव्हान न राहता, जणू एक वैचारिक खाद्यच बनली आणि मी अंतर्मुख होऊन ते नाटक करू लागलो... मला वाटतं- राजसत्ता जगभरात जिथे-जिथे म्हणून संवेदनशील माणसांना चिरडू पाहील, तिथे-तिथे हे असे छोटे-छोटे प्रयोग आणि लेखक अक्षरशः फुटून वर येत राहतील, ते थांबणार नाहीत. जमीन कितीही धोपटण्याचा प्रयत्न करा, पण तिच्यातून नवा अंकुर फुटल्याशिवाय राहणार नाही- अशी खात्री देणारा हा एक अत्यंत महत्त्वाचा प्रयोग असल्याचं मी म्हणेन.

**प्रश्न :** 'रिंगण' नाटकानंतर आता जवळपास वर्षं उलटलंय. आज मागे वळून पाहताना त्या प्रयोगविषयी, त्या कामाविषयी तुला काय मांडावंसं वाटतंय?

- दाभोलकर-पानसरे-कलबुर्गी यांच्या खुनानंतर न्यायासाठी रस्त्यावर उतरणं आणि आपला अहिंसक लढा चालू ठेवणं, हा एक विचार तर अर्थातच होता. पण, दुसरीकडे आपल्या लेखनातून फुले-शाहू-आंबेडकर यांची नावं घेणारे आणि प्रत्यक्ष कृतीतून मात्र मध्यमवर्गीय प्रतिमाच सतत उजागर करणारे- अशांनासुद्धा यातून काही कृतिशील संदेश मिळावा, असा हेतूही होता. त्या अर्थाने 'रिंगण' हे आमचं आक्रंदन होतं. आपण लहानाचे मोठे होत जाणं, म्हणजे आपला प्रवास व्यक्ती ते समष्टी असा होत जाणं... 'रिंगण'ने हेच काही प्रमाणात साधण्याचा प्रयत्न केलाय...

(शब्दांकन : स्वप्नील जोगी)

**समीर शिपूरकर**
Mob. : 9422089310






कार्यकर्ता :
प्रबोधन

# देवाजी तोफा

cdtofa@gmail.com
Mob. : 9421734018

**संवादक : सविता तारे**

मेंढा-लेखा हे गाव आता 'आमच्या गावात आम्हीच सरकार'
या अभिनव प्रयोगासाठी भारतभर ओळखले जाते.
हा प्रयोग घडवून आणण्यात मोहन हिराबाई हिरालाल
यांच्या बरोबरीने देवाजी तोफा अग्रभागी होते.
त्यानंतरही आदिवासी प्रदेश, आदिवासी जीवन व आदिवासी संस्कृती
यांच्या संदर्भात जगजागृती करण्याचे काम देवाजींनी केले आहे.
लोकशाहीचा प्रयोग आणि तळागाळातल्यांना विकासाची संधी मिळावी
यासाठी आणि ते करत असताना निसर्ग व एकूणच साधनसंपत्तीचा
विनियोग यासंदर्भात केलेल्या प्रबोधनाकडे लक्ष वेधणे,
हा या पुरस्काराचा अर्थ आहे.



देवाजींचा जन्म झाला २० ऑगस्ट १९५६ रोजी, गडचिरोली जिल्ह्यातील धानोरा तालुक्यात जंगलाच्या कुशीत वसलेल्या मेंढा(लेखा) या लहानशा आदिवासी गावात. देवाजींचे वडील नवलू तोफा. त्यांच्याकडे वंशपरंपरागत जमीन नव्हती. त्यामुळे ते लेखा गावातल्या पाटलाकडे नोकरी करत. त्या मजुरीतून पै-पैसा साठवून त्यांनी गावात सहा एकर जमीन घेतली. देवाजींची आई कुकसीबाई दुग्गा. त्या मेंढा गावातल्याच. तोफा आणि दुग्गा हे अनुक्रमे सहा व सात देवे असल्याने त्यांच्यात सोयरसंबंध होतो. मध्य भारतातील गोंड या नावाने ओळखल्या जाणाऱ्या आदिवासींमध्ये सारखेच देव असणाऱ्या मुला-मुलींचे लग्न निषिद्ध आहे. आई-वडील दोघेही अशिक्षित. देवाजींचा एक मोठा भाऊ आणि एक मोठी बहीण. भाऊ बांधकाम खात्यात रोजंदारीवर होता, परंतु अकाली गेला. बहिणीचे लग्न जवळच्याच मरेगावला झालेलं.

देवाजींचं शिक्षण जास्त नाही. फक्त चौथीपर्यंतच. त्या वेळी मेंढ्यात तर शाळा नव्हतीच, पण लेख्यातही ती चौथीपर्यंतच होती. देवाजी तेवढंच शिकू शकले. शाळा संपल्यावर इतर सर्व आदिवासी मुलं करतात त्याप्रमाणे गुरांमागे जाणे, जंगलात हिंडणे. थोडं मोठं झाल्यावर घरच्या शेतीत हातभार लावणे, नंतर बांबू कटाई, गिट्टीकाम आणि मिळेल ती मजुरी करणे हे उद्योग सुरू झाले. लग्न विसाव्या वर्षी झालं, गावातल्याच रखमा नावाच्या मुलीबरोबर. ते त्यांनी स्वतःच ठरवलेलं. मानोबाई आणि रैनू दुग्गा हे रखमाबाईचे आई-वडील.

देवाजी सांगतात त्याप्रमाणे ते लहानपणी फार लाजरे आणि संकोची होते. अजिबात बोलत नसत. पण ऐकत मात्र एकचित्ताने. शिक्षण झालं नसलं तरी अभ्यासाची आवड खूप. अभ्यास करायचा म्हणजे वाचन आलंच. त्यामुळे सगळ्या तऱ्हेची माहिती असायची. तुकडोजीमहाराजांची 'ग्रामगीता' लहान वयातच वाचलेली आणि तिचा खोलवर प्रभाव पडलेला. त्याचबरोबर छंद म्हणजे निरीक्षणाचा. जंगलात जाऊन झाडं, गवत, वेली, पशू, पक्षी पाहत राहायचे. त्यांनी सांगितलं की, एकदा तर त्यांनी जंगलात उंदीर किती प्रकारचे आहेत, याचाच अभ्यास केला होता. ही अभ्यास करण्याची वृत्ती हाच देवाजींचा मूळ स्वभाव.

देवाजी तरुण झाले तेव्हा या सगळ्या परिसरात जंगल खात्याच्या मनमानीपणाचीच चर्चा होती. पारंपरिक आदिवासी जीवन जंगलावर अवलंबून होते. त्यामुळे त्या हक्कावरच घाला आला, तेव्हा त्याची चर्चा गावकऱ्यांमध्ये रोजच व्हायला लागली. गावातली वडिलधारी मंडळी जमून गोष्टी करत, त्या वेळी देवाजी ऐकत राहत. त्या भागातील समाजवादी विचाराचे ज्येष्ठ पुढारी लालश्याम शहामहाराज गावात यायचे. त्यांच्या बैठका होत, मोर्चेही निघत. देवाजी त्यात हळूहळू सामील व्हायला लागले. शिक्षण कमी असलं तरी समज चांगली होती. शिवाय तुकडोजी महाराजांच्या प्रभावामुळे सगळ्यांनी मिळून काही तरी केलं पाहिजे,

## आम्ही निसर्गपूजक आहोत!

हिंसेने हिंसा संपणार नाही, उलट जास्त वाढेल. जीवाची पर्वा न करता, सर्वांशी संवाद साधत अहिंसेच्या मार्गाने सतत काम करणे, हाच हिंसेवर मात करण्याचा एकमेव उपाय आहे. विरोध करणाऱ्यावरही प्रेम करणे, बंदूकधाऱ्याशीसुद्धा न भिता चर्चा करण्यास तयार असणे, 'तुम्ही मारणार असल्यास आम्ही मरायला तयार आहोत, परंतु आम्ही तुम्हाला मारणार नाही' असे शांतपणे सांगणे, आपल्याला जे बरोबर वाटते ते दुसऱ्याला सांगणे आणि दुसऱ्याचे म्हणणेही खरे असू शकते असे समजून ऐकणे- अशी तयारी ठेवावी लागेल.




अशी तळमळही होतीच.

देवाजी १९७९ ते १९८४ या काळात लेखा ग्रामपंचायतीचे सदस्य होते. मेंढा, कन्हारटोला व लेखा या तीन गावांची मिळून ही गटग्रामपंचायत बनलेली. मेंढ्यातल्या लोकांनी त्यांच्यातले गुण ओळखून त्यांना एकमताने सदस्य नियुक्त केले. नंतरच्या खेपेला म्हणजे १९८४ ते १९८९ या काळात तर ते सरपंचही झाले. या काळातच ‘जंगल बचाव, मानव बचाव’ ही मोहीम सुरू झाली. सन १९८४ मध्ये गडचिरोलीत एक मोठा मोर्चा निघाला. देवाजी त्यात सामील झाले. नंतरच्या महिन्यात चळवळीने आणखी जोर धरला. देवाजी त्या सगळ्या कार्यक्रमात हिरीरीने भाग घ्यायचे– ते भाषणं द्यायचे नाहीत किंवा इतर नेत्यांसारखे पुढे–पुढेही करायचे नाहीत. पण विषय काय आहे ते समजून घ्यायचे, ऐकायचे, त्यावर विचार करायचे. ते सरपंच झाले तेव्हा लोकांना वाटायला लागले की, याला सगळं माहिती असेल. पण प्रत्यक्षात त्यांना ती माहिती असायची असे नाही. पण मग ते समजून घ्यायचा ध्यास त्यांना लागला. कोणतीही गोष्ट समोर आली की तिचा संपूर्ण अभ्यास केला पाहिजे, ही जी सवय लागली ती तेव्हापासूनच.

‘जंगल बचाव, मानव बचाव’ मोहिमेमध्येच देवाजींची मोहन हिराबाई हिरालाल या कार्यकर्त्याशी ओळख झाली आणि स्वाभाविकरीत्या मैत्री जुळली. विकासाच्या नावावर विनाशच घडवून आणणाऱ्या इंचमपल्ली–भोपालपट्टनम यासारख्या मोठ्या प्रकल्पांना विरोध करण्याचा जरी या मोहिमेचा उद्देश असला तरी, त्या निमित्ताने लोक, जंगले, लोकांचा जंगलावरचा अधिकार, जंगलांचे व्यवस्थापन, त्यामधली सरकारची भूमिका, लोकांच्या जबाबदाऱ्या अशा मूलभूत विषयांवरची चर्चा छेडली गेली होती. या मुद्यांचा खोलवर वेध घ्यावा म्हणून ‘वृक्षमित्र’ संस्थेने धानोरा तालुक्यातील २२ गावांचा ‘जंगल आणि लोक’ या विषयावरती सखोल अभ्यास करायचे ठरवले. त्या आधी लोकजागृती करण्यासाठी म्हणून एक सायकल यात्रा त्या गावामधून काढली. देवाजी या यात्रेत सामील झाले आणि मेंढा(लेखा) गाव तर नंतरच्या काळात सगळ्या प्रक्रियांचे केंद्रच बनले.

त्यांच्या अभ्यासू वृत्तीला धरून या सर्व वाटचालीसोबतच त्यांचा आदिवासी संस्कृतीचा अभ्यासही सुरू होता. त्यात गाव हा आधारभूत घटक आहे. मेंढा (लेखा) गावानंतर आठ गावांची डोंगरदेव जागेजवळ जमणारी एक मधली संघटना आहे. मग बत्तीस गावांचा इलाका अशी बांधणी आहे. त्यातही त्यांचा आवर्जून सहभाग असतो. जिल्ह्यात व बाहेरही ते जात असतात. कुठल्याही शाळेत न जाता हिंदी भाषा ते उत्तम शिकले. त्यांच्या अभ्यासू वृत्तीमुळे ते सतत शिकत असतात, त्यामुळे धर्म–संस्कृतीबाबतचे त्यांचे विश्लेषण व मांडणी वेगळी असते आणि ती ते लोकांसमोर नेहमीच प्रभावीपणे मांडत असतात. महात्मा गांधींचे हिंद स्वराज, विनोबा भावे यांचे स्वराज्य शास्त्र व डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांच्या लेखनाचेही त्यांनी वाचन करून त्यावर मनन–चिंतन केले. त्याचाही त्यांना विचार स्पष्ट होण्याकरिता खूप लाभ झाला.

देवाजींचे नेहमीच सांगणे असते– ‘मी सांगतो म्हणून काहीही करू नका. स्वतःवर विश्वास ठेवा. सर्वांचे ऐका, सगळीकडे पाहा; पण फक्त दुसरे करतात म्हणून तसे करण्याचा प्रयत्न करू नका. स्वतःच्या व आपल्या वस्तीच्या हितासाठी ग्रामसभेत किंवा शहरात राहत असाल, तर मोहल्लासभेत सर्व सहमतीने निर्णय होईल तेच करा.’

पुढे प्रश्न व उत्तर या स्वरूपात देवाजी तोफा यांना आणखी जास्त समजून घेण्याचा प्रयत्न करू या.

**प्रश्न :** देवाजी, ‘आम्ही गोंड नाही, कोया आहोत’ असे तुम्ही म्हणता; त्याचा अर्थ काय?

– गोंड हा येथील आदिवासींच्या भाषेतील शब्द नाही. बाहेरील अभ्यासकांनी आम्हाला गोंड म्हटले आणि मग तेच नाव प्रचलित झाले. कोयाचा आमच्या भाषेत अर्थ माणूस असा आहे. तीच आमची खरी ओळख आहे.

**प्रश्न :** इतर धर्माप्रमाणे गोंडी धर्म स्थापन होत असून सुशिक्षित समाजाकडून त्याला प्रतिसाद मिळत आहे. या संबंधात आपले काय म्हणणे आहे?

– आम्ही हिंदू नाही. धर्माचा उपयोग निवडणुकीच्या राजकारणाकरिता करण्याच्या गरजेतून इतर धर्मांसारखा गोंडी धर्म स्थापन करायची प्रक्रिया नव्याने सुरू झाली आहे. माणसाने सर्व माणसांशी माणुसकीने वागणे– म्हणजेच माणुसकी– हाच आमचा खरा धर्म आहे. आम्ही निसर्गपूजक आहोत.

**प्रश्न :** पारंपरिक अशी गायता (गावपुजारी), भुम्या, मांझी ही पदे काय आहेत? ती वंशपरंपरागत आहेत काय?

– गायता म्हणजे गावपुजारी. सामूहिक पूजेमध्ये याची भूमिका महत्त्वाची असते. असे असले तरी पूजा केव्हा करायची, हे तो ठरवू शकत नाही. गावसभेत त्याचा निर्णय

होतो. बत्तीस गावांचा आमचा इलाका आहे. इलाक्याची सामूहिक पूजा करण्यासाठी भुम्या हे पद आहे. बत्तीस गावात आपसात वाद किंवा भांडण झाल्यास भांडण मिटवण्याचे काम गावातील सर्व लोक मिळून सर्वसहमतीने करतात. आमच्यात फक्त पाच जण म्हणजे पंच नाही; न्याय करण्याकरिता होणाऱ्या सभेत सर्वांना सहभागी होण्याचा व बोलण्याचा समान हक्क आहे. न्याय करण्यासाठी बसलेल्या सर्व लोकांना पंच म्हणतात. जो आरोपी आहे, त्याचीही सहमती झाल्याशिवाय न्याय होत नाही. या संदर्भात भांडण आपसात सहमतीने मिटविण्याकरिता परंपरा, रीती-रिवाजांची माहिती देऊन मदत करणारी बत्तीस गावांकरिता नेमलेली व्यक्ती म्हणजे मांझी. ही पदे लोकनियुक्त आहेत, वारसाहक्काने चालत आलेली नाहीत; म्हणून अयोग्य व्यक्तीला दूर सारून योग्य व्यक्तीला निवडण्याचा लोकांना अधिकार आहे.

**प्रश्न :** सर्वसहमतीने न्याय झाल्यावर गुन्हेगाराला शिक्षा कशा प्रकारची असते?

– आमच्यात मारहाण करणे, चटके किंवा डाग देणे, उपाशी ठेवणे, बांधून ठेवणे किवा खोलीत कोंडून ठेवणे अश्या शारीरिक शिक्षा कधीच नसतात. म्हणून आमच्या संस्कृतीत जेल हा प्रकारच नाही. आरोपीने गुन्हा मान्य केल्यावर त्याची आर्थिक परिस्थिती पाहून काही पैसे, धान्य, कोंबडी, बकरे, डुक्कर अशा सामूहिक जेवणाकरिता उपयोगी गोष्टी त्याच्या सहमतीने ठरवून घेतात. हा दंड म्हणजे त्याला समाजात मिसळून घेण्याचा सामूहिक भोजनाचा कार्यक्रम असतो. ज्याची आर्थिक परिस्थिती खूपच वाईट आहे, त्याला त्यातूनही सूट देण्यात येते.

**प्रश्न :** धार्मिक कामात प्रस्थापित जमीनदार किंवा राजा या पदाला महत्त्व असल्याचे दिसते. हा मूळ संस्कृतीचा भाग आहे काय?

– इंग्रजांनी करवसुलीकरिता नेमलेल्या व्यक्ती म्हणजे जमीनदार. हे जमीनदार स्वतःला पुढे राजा म्हणवून घेऊ लागले. आमची संस्कृती व समाजव्यवस्था त्यांच्याही आधीची आहे. धार्मिक कामात जमीनदार किंवा राजा हे पद नंतर घुसडण्यात आले. दडपशाही व भीतीमुळे लोकांनाही ते स्वीकारणे भाग पडले. ते मूळ संस्कृतीचा भाग नाहीत.

**प्रश्न :** ग्रामदान म्हणजे काय? त्यामुळे गावाला काय फायदा झाला?

– शेतजमिनीवरील व्यक्तिगत मालकी स्वतः मालकाच्या निर्णयाने नष्ट करून ती गावाच्या नावावर करणे, म्हणजे ग्रामदान. मालकीविसर्जनाचा हा निर्णय गावाने सर्वसहमतीने घेतला. सर्व तपासणी झाल्यावर महाराष्ट्र शासनाच्या राजपत्रात २०१३ मध्ये हे ग्रामदान अधिकृतरीत्या घोषित झाले. गावाच्या नावाने जमीन झाल्याने कसण्याचा हक्क कायम राहिला, पण विकण्याचा हक्क नष्ट झाला. त्यामुळे शेतजमीन सुरक्षित झाली. ग्रामदान करताना पाच टक्के जमीन वेगळी काढून ग्रामसभेला हस्तांतरित करायची असते. उत्पन्नातील अडीच टक्के धान्य व १० टक्के पैसे ग्रामकोशात जमा करण्याचा निर्णयही गावाने सर्वसहमतीने घेऊन अमलात आणला. त्यामुळे गावात कोणीच भूमिहीन राहणार नाही, अशी व्यवस्था लोकांनी स्वतःहून केली. गाव 'एक कुटुंब' झाला. कोणीही बेरोजगार व उपाशी राहणार नाही, अशी व्यवस्था गावाच्या पराक्रमाने अस्तित्वात आली.

**प्रश्न :** ग्रामसभेचे नियम कुणी तयार केले? महत्त्वाचे नियम काय?

– महाराष्ट्र ग्रामदान अधिनियम १९६४ ने ग्रामसभेला दिलेल्या अधिकाराप्रमाणे ग्रामसभेचे नियम ग्रामसभेनेच सर्वसहमतीने तयार केले. महत्त्वाचे नियम-

१. ग्रामसभेच्या पूर्वपरवानगीशिवाय बाहेरील कोणीही गाव हद्दीत काम करू नये.

२. गावाशी संबंधित सर्व निर्णय प्रत्येक घरातून किमान एक महिला व एक पुरुष उपस्थित असलेल्या ग्रामसभेत सर्वसहमतीनेच घेण्यात यावेत.

३. गावातील झगडे-भांडण गावातच सर्वसहमतीने मिटवावे. पोलिसांत व कोर्टात जाऊ नये.

४. आपले काम व्हावे यासाठी सरकारी कर्मचारी किंवा इतर कोणालाही पैसे, धान्य, दारू, कोंबडी इत्यादी प्रकारे लाच देऊ नये. दिल्यास त्याची पावती घेणे बंधनकारक आहे. पावती न घेता दिल्यास तितकेच ग्रामसभेतही जमा करावे लागतील.

५. गावात दारू काढून विकण्यास व खरेदी करून पिण्यास मनाई आहे.

६. फळे, फुले, पाने, कंद-मुळे व मध यासाठी कुणीही झाड तोडू नये.

७. जीवनावश्यक कामासाठी झाड तोडणे आवश्यक असल्यास ग्रामसभेच्या पूर्वपरवानगीशिवाय तसे करता येणार नाही.





**प्रश्न :** बहुमताने निर्णय घेऊ नये, असे तुम्हाला का वाटते?

– बहुमताने निर्णय घेताना अटळपणे दोन गट पडतातच. ते गट एकमेकांचे पाय ओढण्यात बुद्धी, पैसा व वेळ खर्च करतात. त्यामुळे बहुमताने घेतलेल्या निर्णयाची अंमलबजावणी करताना काहींचा विरोध असल्याने ती कधीही यशस्वीरीत्या होऊ शकत नाही. शिवाय, अल्पमतातील व्यक्तींचे म्हणणेही खरे असू शकते; परंतु त्याकडे दुर्लक्ष करून बहुमताचा निर्णय घेतल्यामुळे अंतिमतः सर्वांचेच नुकसान होण्याची शक्यताही तेवढीच असते.

**प्रश्न :** सर्वसहमतीने निर्णय घेण्याचे फायदे काय?

– सर्वसहमतीमध्ये दोन्ही किंवा सर्वच बाजूंचा विचार होतो. बहुमतात दोन्ही पर्यायांमध्ये काही गोष्टी चांगल्या व काही गोष्टी वाईट असण्याची शक्यता असते; परंतु दोनपैकी एकच पर्याय निवडण्याची मर्यादा असल्यामुळे दोन्हींतील चांगलं-चांगलं एकत्रित करून निर्णय घेण्याची सोय राहत नाही. मात्र सर्वसहमतीमध्ये दोन्ही पर्यायांतील चांगलं-चांगलं एकत्रित करून निर्णय घेण्याची सोय व संधी असते. विरोध करणाऱ्याचे किंवा अल्पमतातील गटाचे किंवा एका व्यक्तीचे म्हणणेही खरे असू शकते, याला मान्यता दिली जाते. केवळ विरोध करतो म्हणून तो शत्रू असतोच, असे नाही. पुढे जाऊन धोका होऊ नये म्हणून तो इशारा करीत असतो. त्याच्या विरोधामुळे बाकीच्यांना विचार करण्यासाठी डोके चालवावे लागते. त्यामुळे सत्य काय, असत्य काय- हे समोर येते. लोक एकमेकांपासून दूर न जाता जवळ येतात. ज्यांना शत्रू समजत होतो, ते मित्र बनू शकतात. गावाची किंवा मोहल्ल्याची एकजूट होऊन शक्ती, वेळ व पैसा वाचतो. बुद्धी चांगल्या विचाराकडे लागते. व्यक्तीचा, गावाचा व संपूर्ण मानव समाजाचाही फायदा होऊन माणुसकीचाही विकास होतो.

**प्रश्न :** भ्रष्टाचारमुक्त आर्थिक व्यवहार व हिशोब याकरिता मेंढा(लेखा) मध्ये काय उपाययोजना केली आहे?

– ग्रामसभेच्या नावाने बँकेत खाते उघडले असून, गावाचे पैसे बँकेत ठेवतो. बँक खातेदार म्हणून दोन व्यक्ती निवडल्या असून, त्यांच्या सहीने बँकेतून पैसे निघू शकतात. पण पैसे काढण्यासाठी आवश्यक पासबुक त्यांच्याकडे ठेवत नाही. पासबुकधारक म्हणून एक व्यक्ती नेमली असून, त्याच्याकडेच पासबुक ठेवतो. ग्रामसभा ठराव करते तेव्हाच पासबुकधारक ते पासबुक बँक खातेदाराकडे देतो. पैसे काढून होताच ते पासबुक परत पासबुकधारकाकडे देणे बंधनकारक आहे. जो पैसे काढतो, तो खर्च करू शकत नाही. खर्च कोण करणार, ते ग्रामसभा ठरविते. जो खर्च करतो, तो हिशोब लिहीत नाही. हिशोब लिहिणारी स्वतंत्र व्यक्ती आहे.

**प्रश्न :** गावाचा अभ्यास गट म्हणजे काय? तो कसा काम करतो?

– आम्ही कोणत्याही विषयावर निर्णय घेण्याआधी गावातील अभ्यास गटात त्यावर अभ्यास करतो. ज्यांना अभ्यासात आवड आहे, असेच स्त्री-पुरुष या अभ्यास गटात स्वेच्छेने भाग घेतात. जे निर्णय ग्रामसभेत घ्यायचे आहेत, त्यावर अभ्यास गटात निर्णय होणार नाही, असे ठरले आहे. अभ्यास करण्यासाठी बाहेरील व्यक्तीचा सहभाग असू शकतो, परंतु निर्णय घेताना बाहेरील व्यक्ती ग्रामसभेत सहभागी होऊ शकत नाही. ज्या विषयावर ग्रामसभेत सर्वसहमती होऊन निर्णय होत नाही, अशा विषयावर अभ्यास गटात चर्चा सुरू राहते. अभ्यास गट त्यांच्या गरजेप्रमाणे व सोईने बसून अभ्यास करीत असतो.

**प्रश्न :** हिंसेने हिंसा संपेल काय? हिंसेवर उपाय काय?

– हिंसेने हिंसा संपणार नाही, उलट जास्त वाढेल. जीवाची पर्वा न करता, सर्वांशी संवाद साधत अहिंसेच्या मार्गाने सतत काम करणे, हाच हिंसेवर मात करण्याचा एकमेव उपाय आहे. विरोध करणाऱ्यावरही प्रेम करणे, बंदूकधाऱ्याशीसुद्धा न भिता चर्चा करण्यास तयार असणे, 'तुम्ही मारणार असल्यास आम्ही मरायला तयार आहोत, परंतु आम्ही तुम्हाला मारणार नाही' असे शांतपणे सांगणे, आपल्याला जे बरोबर वाटते ते दुसऱ्याला सांगणे आणि दुसऱ्याचे म्हणणेही खरे असू शकते असे समजून ऐकणे- अशी तयारी ठेवावी लागेल. सत्य काय आहे याचा निर्णय बोलून होत नसेल तर तो युद्ध करून होणार नाही; तर करून पाहणे व त्यातून शिकणे याने होईल, हे सर्वांनी मान्य करायला पाहिजे.

**प्रश्न :** पाच वर्षे ग्रामपंचायत सदस्य, पाच वर्षे सरपंच, राज्य वन्य जीव मंडळाचे तीन वर्षे सदस्य व विदर्भ वैधानिक विकास मंडळाचे पाच वर्षे तज्ज्ञ सदस्य राहिल्याने सत्तेची चव चाखलेली असूनही- आमदारपदासाठी अनेक राजकीय पक्ष उमेदवारी द्यायला तयार असतानाही निवडणूक लढवायला तुम्ही नकार का दिलात?

– प्रातिनिधिक सत्तेत गेल्यानंतर लोकांसोबत मोकळेपणाने काम करता येत नाही. लोकांकरिता नव्हे, तर लोकांसोबत कामाची व प्रत्यक्ष कृतीची जास्त आवश्यकता आहे. लोकांनी आपली राजनैतिक सत्ता गाव व मोहल्ला पातळीवर प्रतिनिधीला न देता, स्वतः वापरावी. महिला, अल्पसंख्याक व दुबळ्या व्यक्तींचाही सारखाच आदर आहे, हे मान्य करून निर्णय सर्वसहमतीने घ्यावेत. याकरिता लोकांसोबत काम करणे जास्त गरजेचे वाटले म्हणून मी निवडणुकीत उभे राहण्याला नकार दिला.

व्यक्तिगत मालकी-विसर्जन प्रक्रियेतून समता व अहिंसा यावर आधारित समाजनिर्मिती याकरिता लोकांसोबत प्रयोग करीत शिकण्याचे काम करणे मला जास्त आवडते, म्हणूनसुद्धा.

**प्रश्न :** गोटुल म्हणजे काय? गोटुलची रचना कशी असते?

– गोटुल ही गोंड (कोया = मानव) आदिवासींमधील जीवनशिक्षण देऊन चांगले नागरिक तयार करणारी एक परंपरागत शिक्षण व्यवस्था होती. खऱ्या अर्थाने सर्वांना आनंददायी जीवन-शिक्षण तिथे मिळत होते. किशोर वयाच्या मुला-मुलीपासून तर लग्न होईपर्यंतच्या युवक-युवतींची ती एक जिवंत संघटना होती. गावाच्या सांस्कृतिक संघटनेचे केंद्रही गोटुलच होते. गोटुलचे प्रत्येक गावात एक वेगळे घरही असायचे. सर्व मुले-मुली तिथे जमायचे, खेळायचे, नाचायचे. मोठी मुले-मुली लहानांना शिकवायची. त्याशिवाय ते गोटुलघर गाव बैठकीसाठी, तसेच बाहेरून आलेल्या पाहुण्यासाठी तात्पुरते विश्रामगृह म्हणूनही उपयोगात यायचे. गोटुल मध्ये तरुण मुले-मुली एकत्र येतात हे गैरआदिवासींच्या विकृत नजरेला चांगले वाटले नाही व त्यांनी तशी टीका सुरू केली. गोंड आदिवासीमधील नवशिक्षित तरुण पिढीवर त्याचा परिणाम होऊन त्यांनी, सुधारणेच्या नावावर, मानवी समाजाला आदर्शवत असलेली ही सुंदर संस्था व तिचे गावात असलेले घरसुद्धा मोडून टाकले. मेंढा(लेखा) गावसमाजाला अभ्यास मंडळात झालेल्या चर्चेतून ही गोष्ट समजली. १९८९ मध्ये मेंढ्यात गोटुल घर नव्याने बांधण्यात आले. परंतु गोटुल संस्था मात्र तिच्या संपूर्ण वैशिष्ठ्यासह अजून पुनरुज्जीवित झालेली नाही. भविष्यात अधुनिक विज्ञान व तंत्रज्ञानाला गोटुलच्या रचना व कार्यपद्धतीची जोड देऊन विज्ञान-गोटुल ही संकल्पना साकारावी लागेल.

**प्रश्न :** लग्न कसे ठरते? कसे होते?

– गोटुल संस्था अस्तित्वात होती तेंव्हा मुला-मुलींना आपला योग्य जोडीदार निवडण्याची संधी मिळत होती. पण गोटुल तुटल्यावर आता इतर गैरआदिवासी समाजाप्रमाणे पाहायला जाण्याची प्रथा सुरु झाली. गोंड आदिवासींमध्ये हुंडा पद्धत नव्हती, लग्न मुलाच्या घरी होते व मुलाने मुलीकडच्यांना देज देण्याची पद्धत आहे. लग्न घरी येणारे सर्व नातेवाईक, मित्र, निमंत्रित येतांना सोबत तांदूळ, डाळ, लसूण, कांदा, तेल इत्यादी घेऊन येतात आणि ज्यांच्या घरी लग्न आहे त्यांना सहकार्य करतात. एकट्यावर बोजा पडू देत नाहीत. परंतु शिक्षण व तथाकथित सुधारणेसोबतच मुलांनी हुंडा मागण्याचे प्रमाण वाढत आहे.

**प्रश्न :** मुलगा व मुलगी दोघे एकमेकाच्या सहमतीने लग्न करू इक्छितात, पण मुलाच्या वडिलांचा विरोध असेल तर काय होते?

– लग्नाला त्या मुलाच्या वडिलांचा विरोध असला तरी गोंड (कोया) आदिवासींमध्ये लग्नाकरिता मुला-मुलींच्या पसंतीलाच अंतिम महत्त्व दिलेले आहे. त्यांना समाजमान्य पद्धतीने लग्न करून मुलाच्या वडिलांच्याच घरात राहता येते. या पद्धतीला हैवार दायना किंवा घर घुसी असे म्हणतात. त्यात मुलगा-मुलगी स्वतः विचार-विनिमय करून लग्न करायचे ठरवितात व ठरल्याप्रमाणे मुलगी तिच्या आई-वडिलांचे घर सोडून मुलाच्या घरात येऊन घुसते व बसून राहते. पितृसत्ताक व पुरुषप्रधान व्यवस्था असूनही मुलाचे वडील त्या मुलीला वाईट वागणूक देऊ शकत नाहीत. अशी मुलगी आली असल्याची सूचना गावसमाजाला द्यावी लागते. त्यापुढे त्या मुलीच्या सुरक्षिततेची जबाबदारी त्या गावसमाजाची असते. पूर्ण चौकशी करून शेवटी त्या मुला-मुलीचे लग्न लावून देतात.

**सविता तारे**
Mob. : 8007773504







समाजकार्य
कार्यकर्ता
सामाजिक प्रश्न

# विजय दिवाण

**संवादक :** सुरेखा दळवी

गांधी-विनोबा-आंबेडकर या तिघांच्या विचारांतील व कार्यातील संघर्षाचा व समन्वयाचा आशय लक्षात घेऊन काही मुसाफिर कार्यरत असतात, त्यातील एक नाव म्हणजे गागोद्याचे विजय दिवाण. ग्रामदान व भूदान हे विचार कालबाह्य तर झालेले नाहीतच, उलट आजच्या काळात अधिक प्रस्तुत आहेत अशी मांडणी करणारा हा कार्यकर्ता आहे. आणि अर्थातच, निसर्ग आणि माणूस, माणूस आणि समाज, समाज आणि व्यवस्था या तीनही स्तरांवर कसरत करत, जाती आणि वर्ग संपुष्टात यावेत यासाठी लढत राहण्याची गरज आहे, हे अधोरेखित करण्यासाठी हा पुरस्कार आहे.

Mob. : 9028321063



गोहत्या, गोरक्षण, मृत जनावरांचे कातडे सोलण्याचे विशिष्ट जातीतील दलितांचे पारंपरिक काम, त्या कामाला व जातीला दिली जाणारी हीन वागणूक व त्यानिमित्ताने सुरू असलेले जाती-धर्माचे राजकारण या सर्व गदारोळात, शांतपणे व कमिटमेंटने मागील २० वर्षांहून अधिक काळ मृत गुरांना सोलण्याचे काम करत असलेले, गांधीजींच्या प्रेरणेने ज्या सवर्णांनी हे काम स्वेच्छापूर्वक स्वीकारले त्यापैकी एक विजय दिवाण. एक अत्यंत महत्त्वाचे जातीनिर्मूलनाचे कार्य करत असताना, सर्वोदयाच्या विचारधारेने ते मागील ३०-३५ वर्षे विनोबांची जन्मभूमी गागोदे येथे त्यांचे स्मारक कृतिशीलतेने जागे ठेवण्याचे कामही करीत आहेत. तिथे ते संपूर्ण सेंद्रिय शेती, गोपालन इत्यादी तर करतातच, त्यापलीकडे गागोदे हे ग्रामदानी गाव असल्यामुळे विनोबांच्या ग्रामदानाचा विचारही ते पुढे नेत आहेत. हितसंबंधी भांडवलदारांनी गावकऱ्यांना फूस लावून गावाची जमीन व डोंगर बळकावण्याचे केलेले कारस्थान, विजय दिवाण आपल्या शांततामय परंतु चिवट संघर्षाद्वारे हाणून पाडत आहेत. तसेच ग्रामस्वावलंबनाचे विविध पर्याय कसे उभे राहतील, यासाठी प्रयत्नशील आहेत. गागोदे येथील विनोबा स्मारक ट्रस्टचे ते सचिव आहेत.

याशिवाय त्यांचे एक महत्त्वाचे योगदान म्हणजे ज्येष्ठ सामाजिक विचारक प्रा.यशवंत सुमंत यांच्यासह म.फुलेवाडा ते बापूकुटी असे त्यांनी केलेले 'महात्मा ते महात्मा' (पुणे ते वर्धा) पदयात्रेचे यशस्वी आयोजन. त्याद्वारे गांधी, फुले-आंबेडकर यांच्या विचारांची परस्परपूरकता गावोगाव पोहोचवण्याचा त्यांचा प्रयत्न होता. आजही विविध उपक्रमांद्वारे ते तो पुढे नेत आहेत. विनोबांचे बृहद् चरित्रही त्यांनी लिहिलेले आहे. रचना व संघर्ष यांचा मेळ घालून गावपातळीवर, कुठलाही गाजावाजा न करता कार्यरत राहणारा कार्यकर्ता, त्याचप्रमाणे कृतिशील विचारवंत.

**प्रश्न :** एकूणच सर्वोदयाच्या कामाशी तुझा संबंध कसा आला आणि गागोदे येथे तू कसा आलास?

– माझे कुटुंब गांधी-विनोबा यांच्याशी जोडलेले आहे. वडील, काका, मामा घर सोडून कायम या विचाराच्या कामात सक्रिय राहिले. स्वातंत्र्योत्तर काळात गांधीविचाराचे दोन प्रवाह होते. एक-सत्तेतून परिवर्तन व सेवा. दुसरे सत्तेशिवाय विधायक कार्यातून परिवर्तन व सेवा. विनोबा दुसऱ्या प्रवाहाचे नेते होते. आमचे कुटुंब या दुसऱ्या प्रवाहाबरोबर जाणारे होते.

सन १९६२ मध्ये आमचे कुटुंब मुंबईत गोरेगावला स्थायिक झाले. आई सामाजिक कामात असल्याने मृणालताई गोरेंबरोबर महिला मंडळ चालवायची. माझी जडण-घडण एका पोषक वातावरणात झाली, असं म्हणता येईल. पण केवळ त्यामुळे मी या कामात आलो नाही.

मी पक्का मुंबईकर. शिक्षणात मला अजिबात रस नव्हता. मला चित्रकार व्हायचं होतं. पण मध्यमवर्गीय वडिलांना ते मान्य नव्हतं. 'कसले भिकेचे डोहाळे लागले आहेत.' त्यापेक्षा व्हीजेटीआयमध्ये जा आणि टेक्सटाइल्समध्ये शिक.' वडील खादी कमिशनमध्ये

## आपले कार्यक्रम जातिअंताच्या दिशेने असावेत

आज भांडवली शक्ती आणि सरकार हे लोकांची जगण्याची साधने काढून घेत असताना, ग्रामदानाच्या विचारांचा लोकांना आपली संसाधने वाचवायचे बळ देईल, यावर माझा विश्वास आहे. तसेच या देशासमोरील मोठी समस्या दहशतवाद, काळा पैसा यापेक्षा गरिबी आणि जातिव्यवस्था आहे. जाती-अंताशिवाय देशात शांतता आणि समाधान असू शकणार नाही. तेव्हा आपले कार्यक्रम जाती-अंताच्या दिशेने असले पाहिजेत.





होते. तेव्हा या शिक्षणाचा उपयोग खादीच्या कामाला तरी होईल, असं त्यांचं म्हणणं होतं. गोरेगाव तसे चळवळीचे केंद्र. त्यात आणीबाणीची पार्श्वभूमी. शेवटी हुशार मुलांचे म्हणून ओळखल्या जाणाऱ्या रूपारेल कॉलेजमधील शिक्षण मी बी.ए.ची डिग्री न घेता अर्धवट सोडून दिले. तो काळच तरुणांसाठी भारावलेला होता. माझा भाऊ आणि बरोबरचे अनेक तरुण जयप्रकाशांच्या संघर्षवाहिनीत सामील झाले होते. अस्वस्थ असणाऱ्या मला मात्र साहित्यात रस होता. मला एक पत्रिका काढायची होती. लिखाणातील 'शिक्षण घ्यायचे असेल तर झाडू मारण्याचे काम करता आले पाहिजे,' हे ह.मो.मराठ्यांचे म्हणणं मला पटत होते. काहीही करायची तयारी होती. तेव्हा माझा मित्र नवशक्तीचा सुनील वागळे, सर्वोदय साधनाचे रमाकांत पाटील यांच्या संपर्कात होता. तो मला त्यांच्याकडे घेऊन गेला आणि मी मुंबईच्या शांताश्रम कचेरीत काम करायला सुरुवात केली. सर्वोदय साधनेचे काम सुरू असताना ग्रामदानाच्या कामात अचानक ओढला गेलो.

शोभनाताई रानडे व कांबळी तेव्हा ग्रामदानाचे काम पाहत होते. सरकारने ग्रामदानी गावांसाठी एक मूल्यांकन समिती नेमली होती. त्याच सुमारास ग्रामदान मंडळाचे काम करणारे त्यांचे सहकारी ते काम सोडून गेल्यामुळे मला हे काम करण्याची संधी मिळाली. त्याचा मला खूपच फायदा झाला. कायद्याच्या अंगाने विचार करणे आणि गावातील प्रत्यक्ष अनुभव यामुळे या समितीचा अहवाल लिहिता आला. समग्र विचाराची सवय लागली.

विनोबा गेले तेव्हा मी पवनार आश्रमात होतो. विनोबांचे जन्मगाव कुलाबा (आताचा रायगड) जिल्ह्यातील गागोदे(बु.) येथील रघुनाथराव भावे हे (विनोबाजी गेल्यानंतर विनोबांचे सचिव बाळभाई यांना भेटले आणि गागोदे) आता ग्रामदानी गाव झाले आहे, विनोबांच्या गावात आपण काही तरी केले पाहिजे,' असे त्यांनी सुचविले. तेव्हा जवळपास सर्वोदयातील सर्वच जेपींबरोबर होते. अगदी मोजकी माणसे विनोबांबरोबर राहिली होती. त्यात ग्रामदान मंडळ विनोबांच्या सहकाऱ्यांकडे होते; पण कार्यकर्ते नाहीत, अशी स्थिती होती. मी ग्रामदान समितीच्या कामानिमित्त यासंबंधी काम केले होतेच, शिवाय माझे गागोद्यास जाणे-येणे होते. तेथे कालिंदीताई होत्या, तेव्हा बाळभाईंनी हे काम माझ्यावर सोपविले.

विनोबांच्या जन्मघराचा एक ट्रस्ट केला आहे. घरालगत शेती होती, पण पडीक होती. तेव्हा मी घर व शेती सुस्थितीत आणायची आणि विनोबा-विचारांचा प्रसार करायचा ठरवून गागोद्याला आलो. ग्रामदान विचाराचा प्रसार, विनोबांचे जन्मगावातील घर आणि सर्वोदय साधना अशी तीन कामे मी स्वीकारली. सर्वोदय साधनेच्या कामातून हळूहळू बाहेर पडलो. शेतीकामात रमलो.

**प्रश्न :** सर्वच तरुण जेपींच्या आंदोलनात असताना तू विनोबांकडे कसा वळलास? विनोबांवर तर भूदान आंदोलन व आणीबाणीकाळात खूपच टीका झाली होती.

– विनोबा हे एक विचारवंत आहेत, असं मी मानतो. जेपींना मी विचारवंत मानत नाही. जेपी आंदोलनाच्या काळात विनोबा केवळ टीकेचाच नव्हे, तर टवाळीचा विषय होऊनही, माझे त्यांच्याबद्दलचे आकर्षण कमी झाले नाही. भूदान आंदोलनापासून एक मूलभूत परिवर्तनाचा विचार विनोबा मांडत आहेत. मी स्वत: नास्तिक आहे, तेव्हा विनोबांच्या अध्यात्माबद्दल बोलणार नाही. पण जमिनीच्या प्रश्नावरील त्यांची वैचारिक भूमिका आजही मला महत्त्वाची वाटते. कडवे डावे पक्ष किंवा काँग्रेस या प्रश्नावर बंदुकीच्या तालावर वा सीलिंगसारखा कायदा करूनही उत्तर देऊ शकलेले नाही. सर्व आशिया खंडात जमीनमालकीचे जे काही प्रयोग झाले, त्यात जमिनीची खासगी मालकी सत्तेच्या दबावाखाली मालकांच्या इच्छेविरुद्ध काढून घेतली गेल्याचे दिसते.

भूदान आंदोलनात हृदयपरिवर्तनाच्या आधारे लाखो एकर जमिनी मिळाल्या. सहयोगानेच प्रश्न सुटू शकतात. रोज संघर्ष करता येत नाहीत. भूदान व ग्रामदान हा विचार कालातीत आहे. संघर्षाची धार विनोबांनी बोथट केली, असं म्हटलं गेलं. पण हे लक्षात घ्या गांधीजी संघर्ष सत्याग्रह परक्या इंग्रजांच्या विरोधात करीत होते; विनोबांचे काम भारत स्वतंत्र झाल्यानंतरचे आहे. जेव्हा देशाची फाळणी झाली, निर्वासितांचे लोंढे आपल्याकडे येत आहेत, आपला सर्वांत उत्पादक भूप्रदेश पाकिस्तानकडे गेल्यामुळे अन्नसुरक्षेचा प्रश्न आहे, भाषिक-प्रांतिक राज्यरचनेचे वाद तीव्र आहेत; अशा परिस्थितीत अनेक आघाड्यांवर लढत असणाऱ्या आपल्या सरकारला कोंडीत पकडण्यापेक्षा, आपल्या सत्याग्रहाचे स्वरूप बदलणे, ही काळाची गरज होती. आणि विनोबांनी त्याला सौम्यतम सहयोगी सत्याग्रहाचे रूप दिले.

गांधीजी भंगी कॉलनीत जसे राहत तसेच बिर्लांकडेही. तसेच विनोबांच्या भूदान यज्ञात बड्या जमीनदार भांडवलदाराने जमीन दिली, तशीच गरिबानेही आपल्या

जमिनीतील तुकडा दिला. या दोहोंचा गरिबांच्या जगण्याशी संबंध होता. त्यांच्या समस्या सोडविण्याचा प्रयत्न करताना भांडवलदारवर्ग, सत्ताधारी वर्ग या सर्वांमध्ये त्यांचे वजन होते. त्यांच्या ताटाखालचे मांजर न बनता, आपल्या मैत्री-सहयोग व राजकीय हस्तक्षेपातून ते अनेक संस्थांची त्यासाठी आवश्यक निधीची आणि वेगवेगळ्या कायद्यांची उपलब्धी करू शकले, हे लक्षात घेतले पाहिजे. आज असे घडताना दिसत नाही.

**प्रश्न :** गागोद्यात आल्यावर तू काय केलेस?

- विनोबा आश्रम हा ब्रह्मचारी कार्यकर्त्यांचा आश्रम असावा, असा ट्रस्टचा हेतू आहे. विनोबांचे घर विनोबा-विचार-प्रसाराचे केंद्र व्हावे, असा माझा प्रयत्न राहिला. विनोबांचा जमिनीकडे पाहण्याचा दृष्टिकोन रुजविण्याचे काम अजून करतोय. भूदान-ग्रामदानविचार लोकांना पटवून देण्याचा प्रयत्न करीत आहे. लोकांनी जमिनी विकू नयेत, यासाठी त्यांचे मन वळविण्याचे अवघड काम चिकाटीने करीत असतो. लोकांना ते पटत नाही, तरीही जमिनी वाचविण्याच्या सर्व लढ्यात मला शक्य ते योगदान देत आहेत. आश्रमात येणाऱ्यांना तो विचार समजून सांगतोच, पण या गावात राहायला आल्यानंतर मी रोज सकाळी उठून एका शाळेत जाऊन विनोबांचा विचार विद्यार्थ्यांना समजावून सांगणे, विनोबांची पुस्तके विकणे आणि 'ओम तत्सत् श्रीनारायण तू' ही प्रार्थना शिकविण्याचे काम जवळपास सर्व शाळांत केले. खादी व ग्रामोद्योगाची उत्पादने, तसेच आश्रम परिसरात अंगमेहनतीने उत्पादन केलेली शेतीउत्पादने यांची विक्री करणे, सूतकताईचे काम इत्यादी कामे असतात. शेतीचे गणित व समस्या समजून घेण्यासाठी स्वत: शेतकरी बनलोय. तसेच विचारप्रसारासाठी आवश्यक ते लिखाण करीत असतो.

विचार पेरण्याचे काम सोपे नाही, याची मला जाणीव आहे. त्याची किंमतही चुकवावी लागते, हे काही मी नव्याने सांगण्याची गरज नाही. मीही त्याचा अनुभव अनेकदा घेतला आहे. एका तात्त्विक मतभेदामुळे गावाने आश्रमाला वाळीत टाकले, तेव्हा मला माझ्या गरजा कमी करणे अथवा स्वत:च्या गरजापूर्तीसाठी स्वावलंबनाचा अंगीकार करणे सोपे झाले.

**प्रश्न :** मेलेल्या गुरांची कातडी काढण्याचे कामदेखील तू करीत आहेस. गांधीवाद्यांचा गोरक्षणाचा आग्रह आणि सध्या धुमाकूळ घालणारे तथाकथित हिंदू धर्मरक्षकांचे गाईचे प्रेम याकडे तू कसा पाहतोस?

- गागोदे गावात फिरताना मला रस्त्याच्या कडेला मेलेले बैल पडलेले दिसत. गोपुरीचे अप्पासाहेब पटवर्धन मृत जनावरे फाडण्याचे काम करायचे, हे मी त्यांचे चरित्र वाचताना वाचलेले आठवत होते. आणि त्यामागचा विचार लक्षात घेता, आपणही हे काम करावं, असं वाटत होतं. शेवटी वेळ काढून मी देवरुखला रमाकांत आर्ते यांच्याकडे जाऊन हे काम शिकून आलो आणि आश्रम परिसरात हे काम सुरू केले. अशा कामातून निर्माण झालेल्या अहिंसक चामड्याचे जोडेदेखील बनवून घेतले. सध्या गोरक्षक म्हणून वावरणारे बोगस आहेत. त्यांचा वैचारिक गोंधळ आहे. गोशाळा चालवून गोरक्षण कसे होणार? कातड्याचा बाजार चालू ठेवून मेलेल्या गुराचे कातडे काढायचे की जिवंत गुरे कातड्यासाठी मारायची? विनोबांची गोसेवेची दृष्टी वैज्ञानिक आहे. ते म्हणत- गाईला देवता मानून तिची उपेक्षा करणे, तिला नीट खाऊ न घालणे आणि तिचे शोषण करणे- हे सारे शोभादायक नाही. वैज्ञानिक पद्धतीने तिची उपासना केली पाहिजे. गोसेवेची परीक्षा आर्थिक निकषावरच केली गेली पाहिजे. जी गोष्ट आर्थिक निकषावर उतरत नाही, ती जगात टिकू शकत नाही.'

गांधीजींनी सांगितले- जेथे-जेथे गोशाळा आहे, तेथे चर्मालय हवे. गोशाळा म्हणजे जिवंत चैतन्याचा झरा आणि चर्मालय म्हणजे स्मशान. गोशाळा व चर्मालय हा विरोधाभास. पण हे एकमेकांना पूरक तर आहेतच, पण चर्मालय हे गोशाळेला जीवनदान देते, हे सर्वप्रथम गांधीजींनी दाखवून दिले. चर्मालय नसेल तर गुरांचे चामडे वाया जाते, मग चामड्यासाठी जिवंत गुरे मारावी लागतात. तेव्हा चर्मालयामुळे गुराला जीवनदान मिळते, म्हणून चर्मालय चालविणे म्हणजे गोरक्षणाचे कार्य करणे होय.

खादी म्हणजे केवळ वस्त्र नव्हे, तो एक विचार आहे; तसेच मेलेल्या गुराचे कातडे म्हणजे केवळ चामडे नव्हे, त्यामागे ग्रामोद्योग आणि अहिंसक समाजरचनेचा विचार आहे. हे कार्य म्हणजे अस्पृश्यतानिवारण, स्वच्छता व भंगीमुक्ती, श्रमप्रतिष्ठा, गोवंशरक्षण, ग्रामस्वराज्य, रोजगार असा जीवनाच्या प्रत्येक क्षेत्राला स्पर्श करणारा हा विचार आहे.

सर्वोदयी कार्यकर्त्यांनी अत्यंत दुर्लक्षित व उपेक्षित सामाजिक प्रश्न हाती घेऊन कार्य केले. कुष्ठसेवा, खादी, मृत गुरांचे शवच्छेदन ही कामे हाती घेऊन समाजाचे या प्रश्नांकडे लक्ष वेधले. आज ही कामे सर्वत्र व्यापक प्रमाणात होत आहेत. पण मृत गुरांचे शवच्छेदनाचे काम मात्र व्यक्तिगत




पातळीवरच राहिले व कालांतराने क्षीण होत गेले.

जातिव्यवस्था तोडणारा कार्यक्रम म्हणून मी मृत गुरांचे कातडे सोडविण्याच्या माझ्या कृतीकडे पाहतो. या स्वच्छतेच्या कामाला हीन मानून ते एका जातीच्या माथी मारण्यात आले. बाबासाहेब आंबेडकरांनी या कामात जातिव्यवस्थेने अडकवलेल्यांची या कामातून सुटका केली. पण त्यामुळे समाजातील स्वच्छतेचे काम वरिष्ठ जातीने करून त्या कामाला प्रतिष्ठा मिळवून दिली पाहिजे, असे गांधींचे सांगणे होते. मी हे काम करतो. त्यातील विचार कळला, तो कळून उपयोग नाही; तर तो आचरणात आणला, तरच उपयोगी म्हणू. त्यामुळे मलाही स्वत:ला तपासता येते.

**प्रश्न :** महात्मा ते महात्मा अशी पदयात्रा तू काढली होतीस. अशी यात्रा काढावीशी का वाटली?

– मुळातच माझ्यावर विनोबांचा जेवढा प्रभाव आहे, तेवढाच फुले-आंबेडकर यांच्या विचारांचाही. तरुणपणी दलित साहित्य मोठ्या प्रमाणात येत होते. ते वाचत होतो. त्याचा प्रभाव जाणीवपूर्वक होत होता की नाही, ते माहिती नाही. पण समाजाचे भरडलेपण दिसत होते. ज्या सर्वोदयात मी होतो तेथील संस्थांत उच्चवर्णीयच, ब्राह्मण-मारवाडी दिसत. ते सर्व उदारमतवादी असले तरी त्यांच्या मर्यादा कळत होत्या. मराठवाडा विद्यापीठ नामांतर लढ्यात त्यांच्यापैकी एक गट आंदोलनाला समर्थन देत तुरुंगात जायला तयार होता, तर दुसरा गट विरोध करीत होता. मीही जन्माने उच्चवर्णीय. पण ज्या काळात जन्मलो, त्या काळातील वातावरणाने मला वेगळा विचार करण्याची संधी दिली. म्हणूनच सर्वोदयाने गांधी-विनोबा यांच्याबरोबर फुले-आंबेडकरी विचार स्वीकारावा, असे वाटत होते. तशी मांडणी मी करीत होतो. डॉ.सुगन बरंठ हे महाराष्ट्र सर्वोदयाचे अध्यक्ष झाले, तेव्हा मी काढत असलेल्या यात्रेला त्यांनी मान्यता दिली. आणि २००५ मध्येदेखील मी एक यात्रा काढली होती, तेव्हा फुले वाडा- गागोदे- चवदार तळे - नायगाव-वाई असा गेलो होतो. या यात्रेत आमचेच काही सहकारी केवळ ठरावीक जातीत जन्मले म्हणून गावात त्यांच्या घरात काय भोगत होते, कसे जगत होते, हे जवळून पाहता आले. पण खेद याचा होता की, हे सर्व दलित-बहुजन वर्गातील असूनही त्यांच्या खऱ्या प्रश्नापासून दूर राहिले होते. ही गोष्ट मला खुपत होती.

पण डॉ. यशवंत सुमंत यांची गाठ पडली. आम्ही जळगावला एक तीनदिवसीय शिबिर घेतले होते. त्यात सुमंतसरांनी गांधी-आंबेडकर एकमेकांना पूरक कसे, यावरील मांडणी केली होती. आमच्यासाठी हे शिबिर खूपच महत्त्वाचे ठरले. अभ्यास शिबिरातून व्यक्ती बदलते, असा आजवरचा अनुभव आहे. पण एखाद्या संघटनेची मूसच बदलण्याचे श्रेय या शिबिरातील सुमंतसरांच्या मांडणीला आहे. आणि हा बदल कोणत्याही डावपेचाविना हृद्यपूर्वक विचार करून आम्ही स्वीकारला. सर्वोदय संघटना बदलली आणि जातिव्यवस्थेत मेलेली गुरे तरुणवयात सोलविणारी व्यक्ती साम्ययोग पत्रिकेची संपादक झाली.

पुढे केवळ सर्वोदय संघटनेने नाही तर अधिकाधिक पुरोगामी संघटना/व्यक्ती यांच्या सहभागाने गांधी-आंबेडकरविचार समाजापुढे न्यावा, अशी सुमंतसरांची कल्पना होती. तिला महाराष्ट्रातील ४२ संघटनांनी दिलेला प्रतिसाद ही आमच्यात झालेल्या बदलाला मिळालेली पावती होती. या यात्रेचे नेतृत्व आबा कांबळे यांनी केले. चवदार तळे व फुले वाड्यातील पाणी कावडीत घेऊन ही समता यात्रा राज्यात फिरली आणि वर्धा येथे सेवाग्रामला झालेल्या चर्चासत्राने तिची सांगता झाली.

**प्रश्न :** भूदान-ग्रामदान आंदोलन पसरू शकले नाही, याची कारणे काय असावीत, असे वाटते?

– एवढ्या मोठ्या प्रमाणात भूमीचे दान केवळ विनोबांच्या व्यक्तिमत्त्वामुळे मिळाले. पुढे ते वाटण्यात आम्ही कमी पडलो. महसूल खात्याच्या कार्यपद्धतीत ते अडकले. या कामाला सरकारी सहकार्य नव्हतेच. विनोबांनाही वाटले- हे काम भूदात्यांनाच सांगितले असते, तर जमीन लगेच वाटली गेली असती. पुढे विनोबांनी ग्रामदानाचा विचार मांडला. ग्रामदान म्हणजे गावाचे दान नव्हे, तर गावासाठी दान. यात गाव एक परिवार असेल आणि कुटुंबाची जशी जमीन असते तशी सर्व गावाची मोठे कुटुंब म्हणून जमीन असेल. म्हणजे जमिनीचा सातबारा गावाच्या नावाचा व वहिवाटदार व्यक्ती.

याचे दोन फायदे आहेत. एक म्हणजे, जमीनव्यवहारात देणारा व घेणारा या दोघांना मोह असतो. देणाऱ्याला कष्टापासून मुक्ती व आयता पैसा आणि घेणाराला अतिरिक्त पैसा गुंतविता येतो. ग्रामदानात जमीनमालकी व्यक्तीकडे नसल्याने या मोहातून सुटका आणि दुसरे म्हणजे अन्नाचे साधन कायम राहील.

ठाणे जिल्हा पूर्ण ग्रामदान झाला होता, ५००० गावे ग्रामदान झाली होती. विनोबांनी त्यासाठी कायद्याची मागणी केली नव्हती. वरील व्यवहार परस्परांवरील विश्वासातून.

आता कायदा आला. नैतिक विचार कायद्याचे चौकटीत पकडणे म्हणजे चिमटीत पारा पकडण्यासारखे आहे. कायद्याने ग्रामदान बोर्ड आले, तेव्हा कार्यकर्ते म्हणू लागले हे बोर्डाचे काम. लोक-कार्यकर्ते जबाबदारीतून सुटले, बोर्ड कागदावर राहिले.

जेपी-विनोबा वादात आधीच संस्था विनोबांकडे आणि लोक व कार्यकर्ते जेपींकडे- अशी स्थिती झाली होती. १९८० नंतर अनेक पद्धतीचे संस्था-पक्ष पातळीवर विघटन सुरू झाले. पक्ष-संघटना फुटल्या. एनजीओ आल्या. कार्यकर्ते व विचारांची पीछेहाट सुरू झाली. स्वत:साठी काही मिळविण्याच्या विचारापेक्षा, विचार-प्रसारासाठी काहीही गमवायला तयार असणारे होते. मी विचारप्रसाराच्या कामात आहे. फुकट काहीच वाटत नाही. या सर्व बदलाचे परिणाम ग्रामदानी गावातही होत होतेच. मी तर मुंबईलगत गागोदे गावात राहतो. येथे तर राजकीय पक्ष, जमिनीचे दलाल आले. जमिनीच्या व्यवहारांच्या चर्चा सुरू झाल्या. अशी चारी बाजूंनी प्रतिकूल परिस्थिती असताना काही करणं अशक्य होऊन बसलं आहे.

कामाचा विचार करताना समाजातील सामान्य व्यक्तीचा सहभाग मिळवताना, प्रत्येक व्यक्तीला व्यक्तिगत आवडीचे काम तसेच सामूहिक काम कसे करता येईल याचा विचार गांधी-विनोबा करीत असत. म्हणजे लढा सुरू असेल तेव्हा आंदोलनातील सहभाग, तुरुंगवास ही सामूहिक कृती आणि दैनंदिन जीवनात सूतकताई, भंगीमुक्ती-सफाई, सेवाकार्य, ग्रामोद्योग इ. उपक्रम असत. माझ्यासाठी आणि माझ्या देशासाठी काही तरी करण्याची प्रेरणा त्यात असे. आता समाजापेक्षा व्यक्तिगत हित महत्त्वाचे झाले, तेव्हा सामूहिक कामे संपली. ती सरकारची जबाबदारी झाली. उरली फक्त व्यक्तिगत कामे. तीही नेत्यांकडून करून घ्यायची. सामूहिक फंड गेले. स्वत:ची सोय लावणे हेच महत्त्वाचे बनून गेले आहे. पण लोकांना आपला विचार पटेल यावर अजूनही विश्वास आहे. आपण देशाच्या सीमा अतिक्रमणापासून सुरक्षित ठेवू शकत नाही. पण भूमीवर अधिकारच दिला नाही तर ही अतिक्रमणे कमी होतील, असे वाटते. कारण जमीनमालकी आणि त्यातून सत्ता मिळविणे हे थांबेल. एक प्रकारे हे सुरक्षा कवच आहे.

**प्रश्न :** महाराष्ट्र फाउंडेशनचा हा पुरस्कार मिळाल्याबद्दल तुला काय वाटते? या निमित्ताने तू समाजाला काय सांगशील?

– इतकी वर्षं काम करतोय ते कामावरची निष्ठा व विचारांवरील विश्वास यामुळेच. पुरस्काराचा आनंद आहे. त्यामुळे कामाचे महत्त्व सर्वांना पटावे, इतकेच.

आज भांडवली शक्ती आणि सरकार हे लोकांची जगण्याची साधने काढून घेत असताना, ग्रामदानाच्या विचारांचा लोकांना आपली संसाधने वाचवायचे बळ देईल, यावर माझा विश्वास आहे. तसेच या देशासमोरील मोठी समस्या दहशतवाद, काळा पैसा यापेक्षा गरिबी आणि जातिव्यवस्था आहे. जाती-अंताशिवाय देशात शांतता आणि समाधान असू शकणार नाही. तेव्हा आपले कार्यक्रम जाती-अंताच्या दिशेने असले पाहिजेत.

मी निराश नाही. काळाचा प्रश्न असतोच. कार्यकर्ते हे आंदोलनातूनच येतात; पण आज देशव्यापी वैचारिक आंदोलने थांबली आहेत, म्हणून कार्यकर्ते निर्माण होणेही थांबले आहे. पूर्वी अभ्यास शिबिरे होत. अगदी सर्वोदयातदेखील आचार्य दादा धर्माधिकारी, ठाकूरदास, बंग, वसंत पळशीकर आदींचे वर्ग होते. अन्य पुरोगामी चळवळींतही अशी परंपरा होती. ती मधे खंडित झाली. मधल्या काळात ही पोकळी भरण्याचे काम एन.डी.पाटील, किशोर बेडकिहाळ, यशवंत सुमंत आदींकडून विचारवेध मंथनातून चालू ठेवल्याचे दिसते. अशा अभ्यासातूनच आमचा कायापालट झाला आहे.

यशापयशाची चिंता मी कधीच केली नाही. आजही करीत नाही. विचाराची पीछेहाट होते, याचे भय मला कधीच वाटत नाही. देशव्यापी नसली तरी स्थानिक पातळीवर आजही आंदोलने उभी राहत आहेत. नर्मदा बचाव, सेझविरोधी, आदिवासी जमीन हक्क अशा आंदोलनांतून काही कार्यकर्ते पुढे येत आहेत.

स्थानिक संस्था- जिथे राजकीय पक्ष आपल्या चिन्हावर व नावावर निवडणूक लढवू शकत नाहीत, तिथे परिवर्तनवादी चळवळी दुर्लक्ष करून वरिष्ठ पातळीवरील निवडणुका महत्त्वाच्या समजतात. मी निवडणुकांत हस्तक्षेप करीत नाही- अगदी ग्रामादानी गावातही. पण आपल्या विचाराचा प्रभाव पाडायचा असेल, तर परिवर्तनवादी चळवळींनी यात विचाराचा हस्तक्षेप केला पाहिजे, असे मला वाटते. तेव्हा अविचारी लोकांचा विचार करत त्यांचा जप करीत बसणे थांबवून, पीछेहाटीचा बागुलबुवा उभा न करता आपली शक्ती वाढविण्याचे काम आपण केले पाहिजे.

**सुरेखा दळवी**

Mob. : 9821140104







# कार्यकर्ता : असंघटित कष्टकरी
# **सुशीला नाईक**

**संवादक : राजा शिरगुप्पे**

बेळगाव जिल्ह्यातील निपाणी या गावात, औपचारिक शिक्षण वाट्याला न आलेल्या सुशीला नाईक यांनी स्वत:वर लादल्या गेलेल्या ‘देवदासी’पणातून स्वत:ची तर सुटका करून घेतलीच, पण अन्य अनेक महिलांना त्या बेड्यांतून सोडविण्यासाठी संघर्ष केला. त्याचबरोबर तळागाळातल्या अशिक्षित व अंधश्रद्धेच्या जोखडात सापडलेल्या महिलांना बळ देण्यासाठी रचनात्मक कामही केले. पूर्णत: प्रतिकूल परिस्थितीत संघर्ष करून, व्यवस्थेशी टक्कर देत उभे राहता येते व जिंकता येते हे सुशीलाताईंनी दाखवून दिले आहे, त्याचे कौतुक करण्यासाठी हा पुरस्कार आहे.

Mob. : 9343826691



माझ्या महाविद्यालयीन विद्यार्थी जीवनापासून मी निपाणीतल्या बिडी कामगार चळवळीशी जोडला गेलो. ही चळवळ मुख्यतः महिला बिडी कामगारांनी उभी केली होती. ही चळवळ केंद्रीभूत ठेवून मग परिवर्तनवादी आणि प्रबोधनकारी अनेक चळवळींशीही संबंधित झालो. लोकविज्ञान, अंधश्रद्धा निर्मूलन, देवदासी, शेतकरी, दलित आणि स्त्रिया असे या चळवळींचे बहुविध आयामांचे स्वरूप होते. त्यानिमित्ताने जीवनदानी अनेक कार्यकर्त्यांशी संलग्न झालो. सुशीला नाईक ऊर्फ सुशाक्का ही त्यातलीच एक. आम्ही सगळे पुस्तकातून तयार झालेलो परिवर्तनवादी होतो, तर ती थेट जीवनसंघर्षातून अनुभवसिद्ध होऊन परिवर्तनासाठी तयार झालेली कार्यकर्ती होती. या भारतीय समाजव्यवस्थेत धर्म आणि परंपरेच्या जोरावर आज ज्यांना आधीच माणूस म्हणून विकसित होण्याच्या सर्व संधी नाकारल्या गेल्या आहेत, त्या जातीत आणि वर्गात ती जन्माला आली. रूढ अर्थाने कसलेही शहाणपण दिल्याचा दावा करणारे शैक्षणिक वातावरण तिला मिळाले नाही; पण एक नैसर्गिक माणूस म्हणून जगण्याच्या आंतरिक उर्मीने तिला लाभलेल्या जीवनाकडूनच ती शिकत गेली. आजूबाजूच्या काळोख्या वातावरणात प्रकाशाचे स्रोत शोधत राहिली. ती व्यक्तीची समष्टी कधी झाली, हे कदाचित तिलाही कळले नसेल. वंचित, सामान्य आणि परंपरेने दबलेली एक स्त्री दास्यत्वाच्या सर्व बेड्या तोडून किती व्यापक आणि परिवर्तनशील होऊ शकते, हा मध्यमवर्गातून आलेल्या आम्हा सगळ्याच तरुण कार्यकर्त्यांना चमत्कार वाटावा असा साक्षात्कारी अनुभव होता आणि आहे. गेल्या चाळीस-पन्नास वर्षांतील तिने केलेल्या वेगवेगळ्या मोर्चांवरच्या नि:स्पृह लढायांची आणि कार्याची पोचपावती तिला या वर्षीच्या महाराष्ट्र फाउंडेशनच्या पुरस्काराने दिली. दुसरी एखादी सामान्य स्त्री या गोष्टीने अगदी हुरळून गेली असती. पण ही वरवर निरक्षर वाटणारी स्त्री आपले पाय जमिनीवर किती घट्ट रोवून आहे, हे पुरस्काराची बातमी मिळाल्यावर तिने जे उद्गार काढले, त्यावरून स्पष्ट दिसते. ती म्हणाली, ''ज्या चळवळीने मला घडवले, त्या चळवळीचे हे अभिनंदन आहे.''

**प्रश्न :** सुशाक्का, तुझी मुलाखत घ्यायची आहे.

– (माझ्याकडे रोखून पाहत) म्हंजे, तू प्रश्न इचारनार आणि मी शाळेच्या पोरासारकं उत्तर द्यायाचं?

**प्रश्न :** (थोडंसं ओशाळत) तसे नव्हे. तू त्यावरचं आपलं मनोगत– म्हणजे म्हणणं सांगायचं.

– म्हणणं सांगायला तू परशनं कशाला इचाराय पायजे? त्ये तर मला पयल्यापास्नंच पडल्यात आणि त्यावर मी माझं म्हननं बी आजपत्तूर मांडत आलीय आणि अजून मांडतीया.

**प्रश्न :** ती तुझी चळवळीतली भाषणं आज नकोयत. तू आज तुझ्याबद्दल बोलायचं आहे.

– म्हंजे?

**प्रश्न :** म्हणजे तू देवदासी चळवळीत येण्याआधी, कामगार संघटनेत-शेतकरी संघटनेत भाग घेण्याआधी

## लढाई जिंकाया हत्यार लागत नाही!

एका नव्या चळवळीला आमी सुरुवात केल्ती. नंतर निपाणीलाबी परिषद झाली. तवा सौंदत्तीला म्हंजे रेणुकादेवीच्या स्थळाला– जितं पोरींना देवदासी सोडलं जातं, तिथं– जाऊन आंदोलन करायचं ठरलं. 'देवी मुले मागत नाही, देवीला मुले सोडू नका.' अशी चळवळ करायची नक्की केलं. बाबा आडावांच्या पुढारपणाखाली नुस्त्या देवदासीच न्हवं, तर महाराष्ट्रातले अन् कर्नाटकातले बरेच तरुण कार्यकर्तेबी आमच्यासोबत हुते. त्यामुळं आमाला लईच हुरूप आल्ता. 'बिड बॅडरी आप्पा, बिड बॅडरी... देवरगी मक्कळ बिड बॅडरी... (सोडू नका, सोडू नका.. देवीला मुली सोडू नका...)' लई देशभर तिची बातमी झाली.





तुझं आयुष्य कसं होतं, हे पण आम्हाला जाणून घ्यायचंय.

– म्हंजी, तुला आज माझ्या जीवनाची 'कत्ता' सांगू म्हणतोस...

**प्रश्न :** अगदी बरोबर! तू अगदी बरोबर शब्द वापरलास. तू त्या 'मी बाई आहे म्हणून' या मुक्तनाट्यात शेतमजूर स्त्रीची भूमिका करायचीस. त्या वेळी 'काय सांगू माझ्या जीवनाची कत्ता' असं म्हणून तू त्या संवादाला सुरुवात करायचीस आणि मग शेतमजूर बाईची सगळी कहाणी मांडायचीस. थोडंसं तसंच.

– (चेहऱ्यावर हास्य फुललेलं आहे.) लई भारी मजा यायची न्हाई राजू, त्या नाटकायेळी! देवदासींसाठनं 'सावली' केंद्र उभा करत हुतो तवा परचारासाठी आणि थोडंफार पैसं मिळवण्यासाठी आपन ते नाटक करायचो. तवा मी ती कत्ता हुरूपानं सांगायचो. दुक्काला औशीद न्हाई. पन सांगीटल्यावर थोडं हलकं वाटतं. तवा बी मला ते जाणवायचं.

**प्रश्न :** आज मात्र तू तुझी खरीखुरी कथा सांगायचीयस. तुझा बाप काय करत होता, तू कुठं जन्मलीस, कशी वाढलीस, देवदासी कधी झालीस वगैरे...

– हूंऽऽ (दीर्घ सुस्कारा सोडते.) ह्याच गावात (निपाणीत) जनमलो मी. तवा हे गाव आजच्याएवढं मोटं नव्हतं. पन बाजाराचं हुतं. बाप शेती करायचा. म्हणजे सोताची न्हवती. गावातल्याच एका मारवाड्याच्या शेतावर राबायचा. पण तो सोताला कधी शेतमजूर म्हनवायचा न्हाई, शेतकरीच समजायचा. मल्लू तेचं नाव. मल्लूला आम्ही पाच भनी आणि दोन भाऊ अशी सात पोरं झालो. लई काय बरी परिस्थिती नव्हती. पण फार उपाशीबी राह्यला लागत न्हवतं. जातीनं आमी बेरड. तवा लोक मान देयाचे नाहीत. पण जरा बेरडाची जात वाईट म्हणून टरकून बी असायचे. बेरडाचा धंदा एक तर दरोडे घालायचा, न्हाय तर दारू गाळायचा. पण बापानं दोनी कामं कधी आयुष्यात केली न्हाईत. तेला कारण तेची आय. म्हंजे माजी आजी. लई देवगुणाची. तिला आसलं कायी वंगाळ चालायचं नाही. तिच्या बी अंगात ती देव काडायची. पण फकस्त देव काडायची. आनि तिला ते जोगती व्हनं, देवाला सोडनं बी नामंजूर व्हतं.

**प्रश्न :** मग तू कशी जोगती– म्हणजे देवदासी झालीस?

– तेच सांगतूय. एक–दोन वर्सांची हुतो. तवा डोक्यात केसाचा गुंता व्हयाला लागला. तसं रोज अंघुळ, केस इंचरनं आसं घरात कमीच हुतं आणि कामाम्होरं घरच्या मोट्या मानसान्सी त्येच्यासाठी येळ बी कमी भेटायचा. मग कवातरी आजी, कवा आई तो गुंता सोडवायच्या. पण पुन्ना–पुन्ना गुंता हुतच हुता. आजूबाजूची लोकं सांगाय लागली की, ही देवाची जट हाय. ह्या पोरीला देवी मागाय लागलीया. तवा हिला देवीला सोडा. पण आजीचा त्याला ठाम नकार हुता. मग काय झालं, कुणास ठाऊक. थोरला भाऊ काय तरी कारणानं सारकं आजारीच पडाय लागला. तवा अंगात काडलेल्या एका बाईनं सांगिटलं, 'हे सारं सुशीला तुमी देवीला सोडत न्हाई, म्हून व्हायला लागलंय. आनी पोरगं वाचायचं आसंल तर तिचं देवासंगं लगीन लावून टाका.' त्येच्यावर घरात भांडन वाटण्यासारकं लई काय बाय झालं आणि शेवटीला मला देवीला सोडायचं ठरलं. माजी केसात हुनारी गुंतवळ सोडवायचं बी बंद झालं. मग तिची घट्ट जट व्हयाय लागली. मला आटवतं, तिसऱ्या–चौथ्या वर्सीला आमच्या घराच्या दारात लई मोटा मांडव घातलाता आनि मला बाशिंग बांधून नवरीसारकं सजीवल्यालं. सगळीजन येऊन माज्या पाया पडत हुती. मला बी लई मजा वाटत हुती. आनि मग मला सांगण्यात आलं की, आता तू देवाची बाई झालीस. तुजं लगीन आता देवाशी लागल्यालं हाय.

**प्रश्न :** मग शाळा वगैरे?

– थोरला भाऊ आन् भन शाळंला जातच हुती. मी बी त्येंच्याबरूबर जायला लागलो. माजी जटबी लईच वाडल्याली. त्येच्यावर सारकं हळदी–कुकू वाहून ते आणकीच घट्ट झाल्यालं. शाळेत पोरं–पोरी मला जवळ बसू द्यायाची न्हाईत. आपला पाय लागंल जटंला म्हणायची. कुठल्यातरी कोपऱ्यात मी एकलीच बसायची. मला ते काय आवडंना झालं आन् मी शाळेत जायाचं बंद केलं. मला बी कुनी शाळेला जायाचा आग्रेव केला न्हाई. पण एक कांबळे नावाच्या बाई हुत्या. त्या मातर माझ्यासाठी लई धडपडल्या. मला शाळेसाठी बलवायला त्या महिनाभर यायाच्या. पन मी गेलो न्हाई ते न्हाईच.

**प्रश्न :** मग घरी बसून काय केलंस?

– निपाणीत तंबाखूच्या वखारी खूब. आजी आन् आई तंबाखूच्या वखारीत कामाला जायाच्या. मी जरा मोठी झाल्यावर म्हंजे दहा–अकरा वर्सांची झाल्यावर त्येंच्याबरूबर कामाला जायाला लागलो. तोपतूर मी घरात धाकट्या भावंडास्नी सांभाळायचो. माज्या जटंमुळं गल्लीतसुद्धा मला कोन पोरं शिवाशिव हुईल म्हणून खेळाय घ्येयाची नाहीत.

**प्रश्न :** मग महिला बिडी कामगार संघटनेत कधी

आलीस?

– मी संगटनेत आली नाही, आमी सगळ्यांनी मिळून संगटना तयार केली. ह्येच्या आदी निपाणीतल्या या वखारीत काम करणाऱ्या आमा बायकांची गत लईच वाईट हुती. सकाळी आठ–नऊला वखारीत गेलं की, रात्री बारा–एकलाच वखारीतनं सुटका व्हयाची. सगळं तंबाकूतलंच काम. सगळी वखार तंबाकूच्या धुशीनं भरल्याली. त्यामुळं बायकांची छाती नेहमीच भरल्याली. आनि नाक–घशातनं सारकी खोकल्याची उबळ. मजुरीबी फकस्त दोन रुपय भेटायची. हे कमी म्हणून वखार मालकांची, वखारीतल्या मुकादमांची बायकांच्यावरबी वाईट नजर. लाजकाज सोडून सांगतो राजू तुला की, मी ज्या वखारीत काम करायची, त्या वखारीचा मालक येनार म्हंटलं की, आमची मुकादमीन धुरपामावशी तंबाकूच्या चाळणीखाली आमा पोरीस्नी लपवून ठेवायची. हे असं किती दिवस चालल्यालं, माहीत नाही. पण एक दिवस आजूबाजूच्या बायकांकडनं निरोप आला की, निपाणीच्या कालेजमध्ये सुभाष जोशी नावाचे एक सर हाईत. आपल्या घरी समद्या कामगार बायकास्नी मिटिंगीला बोलीवलंय. आम्हासाठी हे सगळं नवीनच हुतं. सगळ्या वखारीतल्या दोन–चार दोन–चार बायका मिळून जोशी गल्लीतल्या सरांच्या घरी मिटिंगीला गेलो. तिथं सरांची बायको सुनीताक्का बी हुत्या, त्येंनी आम्हा सगळ्यास्नी च्या करून दिला. मग सरांनी मिटिंगमध्ये भाषण केलं. आमी किती कस्ट करीत आहोत, आनी मालक लोक त्येच्यावर नुसता मलिदा कसा खात्यात, हे बैजवार सांगीटलं. आमच्या कस्टाचं दाम आमास्नी मिळत न्हाई, हे खरं तर आमास्नी माहीत हुतंच. पण एवड्या सपस्टपणे हे कोन तरी आमच्यासाठी पयल्यांदाच बोलत हुतं. हेच्या इरोधात आमी आंदोलन करनार काय, म्हनल्यावर सगळ्याजनी 'व्हय' म्हणालो. 'आट तास काम, पाच रुपय दाम' ही आमची पयली मागणी झाली आनि गावातल्या सगळ्यात मोट्या वखारीपास्नं संपाला सुरुवात केली. लई दिवस संप चालला. गावातले मालक दाद दितच नव्हते. शेवटी वखारीच्या मालकालाच घेराव घालून बसलाव, तवा कुटं जराशी तड लागली. आमची मागणी मान्य झाली. तवापास्नं आमची संगटना जी बळकट व्हतं गेली, ती कदीच कुटल्या आंदोलनात मागं सरली न्हाई. मग आरोग्य सोईंसाठी, प्राव्हिडंट फंडासाठी, रजांसाठी– असे लई मोर्चे–आंदोलने केली. तुरुंगातबी गेलाव. पण कदी हार मानली न्हाई. कामगारांचे लई प्रश्न मार्गी लावू शकलाव. हेच्यातनं लक्षात आलं की, 'आपण जर एक राह्यलाव, तर आपलं जीवनबी लई चांगलं करू शकताव.'

**प्रश्न :** पण तुझ्या देवदासीपणाचं काय?

– एका बाजूला विडी कामगार म्हणून मी थोडंफार पोटापुरतं मिळवत हुतोच. मग मंगळवार, शुक्रीरवारला देवीच्या नावानं परडी घेऊन गावभर जोगवा मागत हुतो. कामगार संगटनेमुळं लई गोष्टी लक्षात येत हुत्या. आपलं दुक एकट्यानं सोडविता येत न्हाई, त्येला संगटनेचं बळ लागतं– हे चांगलंच उमजलं हुतं. पण गळ्यात बांधल्यालं हे दर्शन देवीची करनी नाही तर मानसाचीच दुष्करनी हाय, हे अजून कळत नव्हतं. त्यामुळं कामगार म्हणून आमच्या हक्कांसाठी भांडत हुतो, पण देवदासी म्हणून सोताचं नशीब म्हणून सोसत हुतो. एक दिवस सरांचा निरोप आला की, तुमाला माहीत असलेल्या सगळ्या देवदासीस्नं घेऊन घरी मिटिंगीला या. तवा माज्यासारक्या बायकांची संक्या लईच हुती. त्यातल्या पाच–पन्नास बायका गोळा केल्या आणि सरांची घरी गेलू. तिथं पुण्यावरनं दोन मान्सं आल्ती. नंतर कळलं की, ते डॉ. नरेंद्र दाभोलकर आणि बाबा आडाव हुते. त्येंनी आमची इचारपूस केली. देवदासी म्हून आमाला भोगाय लागणाऱ्या यातना समजून घेतल्या. हे देवाचं वगैरे काय नसून कशी अंधश्रद्धा हाय आनि त्यामागं काई लबाड लोकांचा हात हाय, हेबी समजावलं. आपले प्रश्न सोडवायचे असतील, या यातनातून भाईर पडायचं आसलं तर एकीची गरज हाय, असं सांगीटलं. मग पुढच्याच महिन्यात निपाणीपासून पन्नास किलोमीटरवर, पण महाराष्ट्रात असलेल्या गडहिंग्लज गावात देवदासींची परिषद झाली. तितं गडहिंग्लजचे प्रा.विठ्ठल बन्ने, श्रीपतराव शिंदे, बापू म्हेंत्री, गारगोटीचे डॉ.वास्कर, निंबाळकर, राजन गवस अशी आमच्यासाठी काम करणारी लई मोटी मान्सं भेटली. मग लक्षात आलं की, आपण एकटं न्हाई. गरज हाय ती कामगार संगटनेसारकी आपलीबी एकी व्हाया पायजे. वखारीत मालकाच्या रूपानं शत्रू समोर दिसायचा; हिथं थेट देवालाच समोर उभा केल्याला! पण आमी सगळ्या एकत्र आल्यावर या देवाच्या मागं हुबा असलेल्या लबाडांची ओळख व्हयाला लागली. गडहिंग्लजच्या गौराबाई सलवादे– ती बी देवदासीच. लई तळतळून बोलली त्या परिषदेत. मग आमी आमच्या मागण्यांचं निवेदन केलं. देवदासींना पेन्शन हवी, रोजगार हवा, घरकुल हवं. महाराष्ट्र आणि कर्नाटक सरकारकडं निवेदनं पाटीवली. वेळ पडली तर मोर्चा–आंदोलनाचीबी तयारी ठिवली. एका नव्या चळवळीला आमी सुरुवात





केल्ती. नंतर निपाणीलाबी परिषद झाली. तवा सौंदत्तीला म्हंजे रेणुकादेवीच्या स्थळाला- जितं पोरींना देवदासी सोडलं जातं, तिथं- जाऊन आंदोलन करायचं ठरलं. 'देवी मुले मागत नाही, देवीला मुले सोडू नका.' अशी चळवळ करायची नक्की केलं. बाबा आडावांच्या पुढारपणाखाली नुस्त्या देवदासीच न्हवं, तर महाराष्ट्रातले अन् कर्नाटकातले बरेच तरुण कार्यकर्तेबी आमच्यासोबत हुते. त्यामुळं आमाला लईच हुरूप आल्ता. 'बिड बॅडरी आप्पा, बिड बॅडरी... देवरगी मक्कळ बिड बॅडरी... (सोडू नका, सोडू नका.. देवीला मुली सोडू नका...)' लई देशभर तिची बातमी झाली. टीव्हीवरबी दाकिवलं. तवापास्नं दोनी राज्यातल्या सरकारांचं आमच्याकडं लक्ष गेलं. आन् आदूनमदून सरकारी अधिकारीबी भेटाय याय लागलं. काय काय लिवून घिऊ लागलं. पूर्वी सौंदत्तीला गुपचूपपनं देवीला पोरी सोडायचं चालू हुतं. सोडायचं नाही असा कायदा हुता, पण पोलिसांचं भय न्हवतं. आतामातुर पोलीस खातं अशा गोष्टींकडं लक्ष देऊ लागलं. आन् जवळपास देवीला पोरं सोडायचं बंद झालं.

**प्रश्न :** देवदासीची सगळ्यात मोठी खूण तिच्या केसातली जट. तुझी जट तर जवळजवळ दहा किलोची आणि लांबलचक होती. पण तू ही जटानिर्मूलनाची चळवळ सुरू केलीस आणि आजही तुझं हे काम चालू आहे.

– व्हय. देवदासी म्हणजे जटेला लई महत्त्वाची मानत्यात. परत्येक्ष देवीचा आशीर्वादच त्यो, आसं समजत्यात. त्येला हात घालणं म्हणजे थेट देवीलाच दुकीवल्यासारकं हाय, असा समज हाय. मी सरास्नी म्हनलं, 'आपल्याला ही देवदासीची पद्धती बंद करायची आसंल, तर पयलं ह्या जटंला काडायला पायजे. तवा माजीच पयली जट काडायची.' सर म्हणीत हुते, थोडे दिवस तुमची जट ऱ्हावू दे. देश-परदेशातील लोक येणार हाईत. त्येंना हे किती वाईट आसतंय, हे कळू दे. मग मी म्हनलं- न्हाई, सुरुवात माज्यापास्नंच करायची. मग सरांच्या घरातच जाहीरपणे मी माजी स्वोताची जट कापली आणि तवापास्नं ह्यो जट निर्मूलनाचा कार्यक्रम सुरू झाला. आजपुतूर दोन-चार हजार तरी जटा आमी कापल्यात. कामगार संगटनेच्या कार्यकर्त्यांनी आनि तुमच्यासारक्या भावांनी यासाठी आमाला लई मदत केली. बंगलोरच्या एका कलेक्टरच्या मुलीला जट आल्ती. यवडा मोटा कलेक्टर, पण देवीच्या भीतीनं तो जट कापायला घाबराल्ता. मी म्हनलं, 'देवीचा सगळा कोप मी माज्या अंगावर घेती; तू काळजी करू नगं.' मी तिची जट कापली. आज ती पोरगी अमेरिकेत डाक्टर हाय. आसं बरंच काय बाय चालवलेलं.

**प्रश्न :** मग 'सावली' कधी निर्माण झाली?

– कामगार संगटनेतल्या कामगार बायांचे प्रश्न कामगारकल्याण खात्याकडं आणि समाजकल्याण खात्याकडं मारगाला लागत हुतं. पण देवदासींचं म्हणजी त्येच्या राहण्याचं, पोटापाण्याचं प्रश्न कसं सोडवायचं, हे समजत नव्हतं. मग कळलं की, समाजकल्याण खात्याकडं त्याबद्दल काय योजना हाईत. मग देवदासींच्या पुनर्वसनासाठी, त्यांच्या पोरांच्या शिक्षणासाठी आनि पोटापाण्याच्या धंद्यासाठी शिक्षण देणारी संस्था काडायची. कामगार संगटनेमार्फत आदीच चार-पाच ठिकाणी स्वस्त धान्याची रेशन दुकानं सुरू केल्ती, त्येचा उपेग आणि फायदा समोर दिसतच हुता. मग देवदासींसाठी काम करणारी सावली नावाची संस्था काडायचं ठरलं. तुमी सगळी हुताच की मिटिंगला. मग आपुन भागातल्या देवदासींचा सर्वे केलाव. आनि ही संख्या लईच मोठी हाय, ह्ये लक्षात आल्यावर संस्था काडायचं नक्की केलाव. तिच्या परचारासाठी आणि पैसा गोळा करण्यासाठी आपण सगळ्यांनी मिळून नाटक केलाव. तूच लिवला हुतास की.

**प्रश्न :** पण त्या नाटकाची खरी लेखिका तूच आहेस. तू सांगितलेले संवाद आणि गाणी फक्त मी लिहून काढली, एवढंच. नाही तर मला कुठं देवदासीचं जगणं नीट माहीत होतं? नाव पण तू अगदी झकास दिलं होतंस. तेव्हा ते ज्योती म्हापसेकरांचं 'मुलगी झाली हो' हे नाटक गाजत होतं. तू नाव दिलंस 'मी बाई आहे म्हणून...' नाटक कसं लिहावं आणि कसं करावं, हे खरं तर तूच मला अन् माझ्या सर्व सहकाऱ्यांना शिकवलंस.

**प्रश्न :** व्हय बाबा. पण आमाला लिवाय-वाचाय कुटं येतंय! लिहून काढलासा तुमीच. आपण त्या नाटकाचे खेळ केले. जास्ती पैसा नाय मिळाला. पण 'सावली'चं आन् तिच्या कामाचं नाव झालं. कर्नाटक सरकारच्या समाजकल्याण खात्याच्या मदतीनं बेळगावच्या अनू नवाथेपाळणाघर चालवायच्या. त्यांनी आमाला निपाणीला येऊन मार्गदर्शन केलं. आपली पाळणाघरं बी दाकिवली. मग निपाणीत सावलीमार्फत आमी कामगार बायका आनि देवदासींच्या मुलांसाठी पाच पाळणाघरं सुरू केली. त्या वेळी अंगणवाड्याबी सुरू केल्या. मग संस्थेचं काम बी वाढाय लागलं. देवदासींना कामं शिकविणारी शिबिरं घेतलाव.

**प्रश्न :** ‘सावली’ची पहिली अध्यक्षा तूच झालीस ना?

– व्हय. कारण संसार नसल्याली, कारखान्याच्या संपामुळे कामधामबी नसलेली मीच बिनकामाची देवदासी हुतो. खरं तर थोडंफार शिकल्याल्या बायका हुत्या, पण त्येंनी कायबाय कारणं सांगून अध्यक्ष व्हायाचं नाकारलं. मी अडानी असूनबी कसलाच आगापिछा न्हाई म्हणून आखीरला मलाच अध्यक्ष केलं. आणि सुनीता वहिनी संस्थेच्या सेक्रेटरी झाल्या. पहिल्या पाच-सहा वर्षांत आमी लई फिरलाव- बेंगलोरपासून दिल्लीपर्यंत. आणि देवदासींच्या पुनर्वसनासाठी लई धडपडलाव.

**प्रश्न :** अक्का, तू शेतकरी चळवळीतली होतीस. खरं तर तुझा शेतकऱ्यांशी काय संबंध?

– आसं कसं म्हणतोस बाबा? मी कामगार म्हणून, मी देवदासी म्हणून ज्या चळवळी केल्या, त्येच्यात तुज्यासारकी शेतकऱ्यांची तरुन पोरं असलेले माझे भाव आमच्यासोबत उभं राह्यले. कामगार म्हणून आमचे हाल बगीत हुतोच. आमचे मालक शेतकऱ्यांचा तंबाकू घेतानाबी त्येंना कसं नाडत हुते, तेबी कळत हुतं. तुमी जवा तंबाकूच्या भावासाठी आंदोलन करायचं ठरिवल्यासा, तवा माझ्या भावांचाच प्रश्न हाय- मग मलाबी आणि आमा सगळ्यांनाच मागं राहून चालणार न्हाई, हे लक्षात आलं. म्हणून सगळ्या कामगार बायका, सगळ्या देवदासी यांना नीट समजावून सांगीटलं आनि आमी सगळ्याच आमच्या भावांबरोबर रस्त्यावर उतरलाव. म्हणून दुक्कं नष्ट करायला एकीशिवाय दुसरा मार्ग नाही.

**प्रश्न :** अक्का, निपाणी परिसरात झालेल्या अंधश्रद्धा निर्मूलन, लोकविज्ञान चळवळी, परिसरात काढलेल्या वेगवेगळ्या आरोग्य आणि शेती यात्रा, स्त्री-मुक्ती यात्रा, साहित्य चळवळी, दलित चळवळ या सगळ्यांत तू सततच कृतिशील अग्रणी राहिलीस. हे असं तुला प्रत्येक ठिकाणी आपण असणं, काम करणं खरंच महत्त्वाचं वाटत होतं; की केवळ सुभाष जोशी सरांच्या आणि आमच्या सहवासात तू आहेस म्हणून...

– तुमी सगळी माजीच मानसं हुता आनि हाईसा, म्हणून मी या सगळ्यात हुते आणि हायबी. हे खरंच हाय. पण काम करताना समजत गेलं की, तुमी जे-जे प्रश्न घेऊन चळवळ करतायसा, ते सगळेच प्रश्न हिकडनं नाय तर तिकडनं आपल्याशीच जोडलेले हाईत. माजं सैपाक करणं विज्ञानाशी जोडलेलं हाय. माजं देवदासीपण अंधश्रद्धेशी जोडलेलं हाय. माजा आजार आरोग्यासी हाय, माज्या कुटुंबाचं आनि गावाचं जीणंबी शेतीवर आवलंबून हाय. हे आसं सारं.

**प्रश्न :** अक्का, हे सगळं काम करताना तुज्या घरातल्या लोकांची तुला किती मदत होती?

– (थोडा वेळ स्तब्ध होत...) थोरल्या भावाचा परवापर्यंत इरोध व्हता. आसलं काय करायचं, तर माज्या घरात राह्यचं नाई. हे सगळं भिकेचे डोवाळे हाईत- म्हणायचा. पण भनींनी आणि धाकट्या भावानं लईच मदत केली. मला सांभाळून घेतलं. मला जे वाटतं, ते करू दिलं.

**प्रश्न :** अक्का, तुला कधी इतरांसारखं लग्न करून चारचौघांसारखा संसार करावा वाटला नाही? किंवा देवदासी प्रथेप्रमाणे कधी झुलवा लावावासा?

– (हसते.) कधीच नाही. माज्या एका भनीचा नवरा प्राध्यापक हाय. तेनं एकदा मला समोर बसीवलं, सांगीटल- मी तुज्यासाठी चांगलं घर काढतू. लगीन लावून दितू. पण मी ठाम नाही म्हनलं. हे बी सांगीटलं की, माज्यामुळं तुमाला काय कमीपणा येईल आसं माज्या आयुष्यात कधीच हुनार नाही. तसं काय झालं, तर मी माजं त्वांड कधीच दाकीवणार नाही. आजबी मी ताट मानानं हुबी हाय. कामगार संगटनेतल्या माज्या कार्यकर्त्या भावांनी नगरपालिकेत निवडून आल्यावर आमच्यासारक्या देवदासीस्नी घरकुलं बांधून दिली. देवदासींचे प्रश्न जेवढे सुटाय पाहिजेत तेवढं आजून नायी सुटले, पण सोडविण्यासाठी आमी आंदोलनं करीतच राहू. आन् लढाई जिंकाया हत्यारं लागत नाहीत, तर मनाची शक्ती आणि एकीची गरज लागते- एवढं मला आजवरच्या आंदोलनानं शिकिवल्याला हाय. परवा ह्या पुरस्काराची बातमी आली आन् मला पयला फोन माज्या थोरल्या भावाचा आला. म्हनला, ‘मला आजपत्तूर तुजं काम नीट कळलं नव्हतं. पण तू किती मोटं काम करतीयास, हे आजच्या बातमीमुळं कळलं.’ पण खरं सांगू राजू, हे काय माझं एकटीचं बक्षीस नव्हं. जोशी सर, सुनीतावहिनी, कामगार चळवळी, संगटनेतली माज्या सगळ्या आया-भयनी-भाऊ कार्यकर्ते आनी तुमीबी- या सगळ्यांचं अभिनंदन हाय, एवढंच मला कळतं!

**राजा शिरगुप्पे**
Mob. : 9423287320






विशेष ग्रंथ पुरस्कार : इर्जिक

# अरुण जाखडे

संवादक : अरुणा ढेरे

मराठी साहित्याच्या क्षेत्रात समीक्षेची, लोकसाहित्याची आणि संशोधनात्मक व अभिजात म्हणावीत अशी महत्त्वाची अनेक पुस्तके प्रकाशित करणारे पद्मगंधाचे प्रकाशक ही प्रमुख ओळख अरुण जाखडे यांची आहे. आणि पद्मगंधा व उत्तम अनुवाद या दोन दिवाळी अंकांचे प्रकाशक-संपादक ही त्यांची दुसरी ओळख आहे. पण त्यांची तुलनेने कमी असलेली तिसरी ओळख म्हणजे ग्रामीण जीवन व ग्रामसंस्कृती यांच्याशी असलेली त्यांची नाळ बरीच घट्ट आहे. ही त्यांची तिसरी ओळख ठळकपणे सांगणारे 'इर्जिक' हे पुस्तक आहे. या पुस्तकातून ग्रामजीवन व कृषिसंस्कृती यांच्या उद्ध्वस्तीकरणाचा आलेख दाखवण्याचा प्रयत्न त्यांनी केला आहे.

arunjakhade
@padmagandha.com
Mob. : 9850086423



श्री. अरुण जाखडे हे शिक्षणाने विज्ञानशाखेचे आणि काही काळ फोर्स मोटर्समध्ये नोकरी केलेले असले, तरी ती त्यांची ओळख नव्हे. त्यांनी त्यांची वाट धरली ती पुस्तक प्रकाशनाच्या व्यवसायामधून. ते 'पद्मगंधा प्रकाशना'चे चालक-मालक बनले, अनेक दर्जेदार पुस्तकांचे व ग्रंथांचे प्रकाशक बनले, 'पद्मगंधा' या दिवाळी वार्षिकाचे जाणते संपादक बनले; तरीही त्यांची ओळख तेवढ्यावरच थांबली नाही. त्यांच्यामधील जी वाङ्मयीन ऊर्जा होती, तिचे समाधान प्रकाशन-संपादनाने पुरते झाले नाही. खरे तर पुस्तकनिर्मिती-विषयीची व्यवसायापलीकडची ओढ असते, तेव्हा त्या पुस्तकामध्ये लेखक-प्रकाशक दोघांचाही सृजनशील असा सहसंबंध असतो. अनेक गंभीर वैचारिक वाङ्मयप्रकल्प प्रसिद्धीसाठी स्वीकारून जाखडे त्यात तसे सृजनशीलतेने गुंतत गेले, सहभागी झाले; मग ते र.धों. कर्वे यांचे समग्र लेखन असो, भारतीय भाषांचे लोकसर्वेक्षण असो, की माझ्या वडिलांची- डॉ.रा.चिं. ढेरे यांची सगळीच ग्रंथसंपदा असो.

जाखडे एकीकडे पुण्यासारख्या शहरात जवळजवळ ३५ वर्षे वास्तव्य करून राहिले आहेत. देश-परदेशांत फिरून आले आहेत. व्यवसायाच्या निमित्ताने वाङ्मयीन जगातल्या थोरामोठ्यांशी संपर्क ठेवून आहेत, तरी त्यांच्या व्यक्तिमत्त्वाची मळणी मुळात गावाकडच्या मातीतूनच झालेली आहे. इथल्या ग्रामजीवनाशी असलेला त्यांचा संबंध केवळ स्मरणरंजना- पुरता नाही, भावाच्या गहिवराचा नाही; तो अधिक खोल, अधिक अर्थपूर्ण किंबहुना जैवसंबंधच आहे. आपल्या या संचिताकडे किंवा अधिक नेमकेपणाने बोलायचे तर- या नाळेच्या वारशाकडे जाखडे यांनी केवळ लेखनाचा कच्चा माल म्हणून पाहिलेले नाही; सदरलेखनाच्या निमित्ताने त्यांनी आपल्या भूतकाळाला, आपण जगलेल्या संपन्न अशा सांस्कृतिक समूहजीवनाला पुन्हा स्पर्श केला आहे, इतकेच.

ललित लेखनाने वैचारिक लेखनाचा जडपणा मोडून त्याला प्रतीतिगम्य व आकलनसुलभ करावे आणि वाचन-निरीक्षणातून स्फुरलेल्या विचारांनी ललित गद्याचे अल्पजीवित्व दूर करीत त्याला प्रगल्भ अनुभवांनी वजनदार करावे, अशी प्रक्रिया सदरलेखनाच्या बाबतीत अगदी कमी वेळा घडते. 'इर्जिक'बाबत ती घडून आली आहे.

पंचवीस-तीस वर्षांपूर्वीचे केवळ मराठीच नव्हे, तर एक प्रकारे प्रातिनिधिक रीतीने भारतीय ग्रामजीवनच 'इर्जिक'मधून समोर आले आहे. किंबहुना, भारतीय ग्रामजीवनाच्या सांस्कृतिक परिवर्तनाचा प्रदेश विशिष्ट नोंदींवर आधारलेला हा व्यावहारिक दस्तऐवज आहे. यातल्या नोंदी शेत-शिवारांच्या आहेत, उन्हाळ्या-हिवाळ्याच्या आहेत, पावसा-पाण्याच्या आहेत, गुरा-ढोरांच्या आहेत, दैनंदिन कामांच्या आहेत, खेळांच्या व मनोरंजनाच्या आहेत, सणा-उत्सवाच्या, व्रत-वैकल्यांच्या आणि श्रद्धा-समजुतींच्या आहेत. मात्र या नोंदी म्हणजे केवळ माहितीचे संकलन नाही. त्यातून सतत स्पंद पावणारे माणसांचे जीवन आहे. त्या जगण्याचा अंत:स्वर 'इर्जिक'ला सदरलेखनाच्या सामान्यपणातून वर

## शेती आणि प्रकाशन-लेखन यात नवसर्जनाचा आनंद

दोन नद्यांच्या तीर्थस्थान नसलेल्या संगमावर मला वाढता आले. हजार वर्षांचा ऐतिहासिक वारसा असलेल्या गावाने मला खूप काही दिले आहे. एरवी भकास आणि पडझड झालेल्या उद्‌ध्वस्त गावात मला हजार वर्षांतली माणसं भेटतात असे भास होतात.
त्या नदीकाठच्या सतींच्या समाध्यांतून त्यांची मौनाची भाषा समजून घेत आलो, नदीच्या काठी वाढण्याचा अनुभव एक वेगळाच असतो. ते नाद, ते गंध, ते स्पर्श, ते आवाज आजही कानांत आहेत. मी अगोदर म्हटल्याप्रमाणे सृष्टीचे एक महाकाव्यच मी जगलो.




उठवणारा ठरला आहे.

हे पुस्तक वाचत असताना ग्रामीण समूहजीवनाचे रंगीत तुकडे जोडलेल्या गोधडीची आत्मीय आठवण होते आणि तिची जीवनदायी ऊब आज अंगाला मिळत नसल्याची अस्वस्थ खंतही वाटते. आपल्या वर्तमानाकडे डोळसपणे पाहण्याचे भान जागवणारे असे हे सजग आणि संदर्भसमृद्ध लेखन आहे.

महाराष्ट्र फाउंडेशन (अमेरिका) यांनी 'इर्जिक'ला पुरस्कार देऊन या कलाकृतीचा यथोचित गौरव केला आहे. त्यानिमित्ताने जाखडे यांच्याशी साधलेला हा संवाद.

**प्रश्न :** जाखडे, आपल्या ह्या संवादाची सुरुवात 'इर्जिक'पासूनच करू या. 'इर्जिक' हे पुस्तक कसे आकाराला आले? संपूर्ण पुस्तकाचा आराखडा किंवा सूत्रबद्ध असं काही मुळात डोक्यात होतं का?

– खरं तर याचे श्रेय 'लोकसत्ता'लाच द्यावे लागेल. तत्कालीन संपादक मा.कुमार केतकर आणि श्री.श्रीकांत बोजेवार यांची ही कल्पना. त्याला मिळालेला प्रतिसाद पाहता, ही लेखमाला पुढच्या वर्षी महिन्यातून दोनदा अशी पुन्हा प्रसिद्ध करण्याचे संपादक व लोकरंग पुरवणी पाहणाऱ्या त्यांच्या सहकाऱ्यांनी ठरवले. आता मला आत्मविश्वास आला होता आणि मी पटकन् 'हो' म्हणालो.

पहिला लेख लिहिला त्याच वेळी वृत्तपत्रासाठी आपण सदर लिहीत आहोत. ते लक्षात घेऊन ग्रामजीवनात घडणाऱ्या समकालीन घडामोडींवर लिहिण्याचे ठरवले. त्या काळात होणाऱ्या शेतकऱ्यांच्या आत्महत्याने मी अस्वस्थ होतो. या आत्महत्या का होतात, याचा विचार करत होतो. माझ्या वडिलांकडून १९५२ च्या दुष्काळातल्या हाल-अपेष्टांबद्दल अनेक गोष्टी ऐकल्या होत्या. वडील सांगायचे- दुष्काळ इतका भीषण होता की, लोक निवडुंगाची फुलं खाऊन जगले. त्या वेळी तर माझा जन्मही झाला नव्हता. पुढे १९७२ चा दुष्काळ तर मी स्वत: अनुभवला होता, पाहिला होता. त्या काळातही शेतकऱ्यांनी आत्महत्या केल्या नव्हत्या. या दोन्ही दुष्काळांच्या तुलनेने तेवढी भीषणता आज नसताना हे का घडावे, हा मला प्रश्न सतावत होता.

ग्रामसंस्कृती १९९० नंतर पूर्ण बदलत गेली आणि यातून लक्षात आले की- बदलत्या ग्रामसंस्कृतीतून जीवनपद्धती बदलली, पण हे बदल सगळ्यांनाच मानवले असे नाही. त्याचे कारण म्हणजे- ग्रामीण, दलित, आदिवासी यांच्या जीवनाचा मुख्य गाभा अथवा ऊर्जा ही त्यांच्या सामूहिक जीवनपद्धतीत आहे. कृषिसंस्कृती ही अशी संस्कृती आहे की, तिच्या अनेक उपसंस्कृती आहेत. ह्या उपसंस्कृतीत 'इर्जिक', 'सावड' अशा गोष्टींनी एकमेकांना मदत व्हायची व मार्ग काढला जायचा. या 'इर्जिक'वर मी पहिला लेख लिहिला. संपादक आणि त्यांचे सहकारी बोजेवार व शुभदा चौकर यांनी तेच नाव लेखमालेला द्यायचे ठरविले. दोन वर्षांच्या या लेखमालेतून हे पुस्तक आकाराला आले आहे.

**प्रश्न :** शहरी वाचकांसाठी 'इर्जिक' शब्दाचा अर्थ सांगाल काय? आता ते आवश्यकच झालं आहे नाही का?

– अहो, शहरीच काय- आता ग्रामीण भागातील नव्या पिढीलाही याचा अर्थ माहीत नसेल; कारण बदलत्या संस्कृतीत आपल्या भाषेतले अनेक शब्द हद्दपार होत आहेत. 'इर्जिक' घालणे- म्हणजे जो शेतकरी आर्थिक संकटात असल्यामुळे गळाठलेला आहे- दावणीला बैल नाही, कणगीत दाणे नाहीत, जमीन पडिक पडायची वेळ आली आहे- अशा वेळी त्या काळात त्याला जी अडचण असेल- उदा. उन्हाळ्यात नांगरटीची- तर 'इर्जिक' घातले जायचे. म्हणजे ठरलेल्या दिवशी गावातले सगळे नांगर त्याच्या शेतात जायचे. एक दिवसातच त्याचे शेत नांगरून दिले जायचे. शिवाय यात त्याला मदत केली, ही भावना नसे; तर या निमित्ताने त्याने इर्जिक घातले म्हणजे- गरिबीमुळे तेलच्या-गुळवणी किंवा लापशी असे गरिबीचे पक्कान्न सगळ्यांनी संध्याकाळी एकत्र खायचे. हे सगळे आनंदाने गाणी म्हणत, चेष्टा-मस्करी करत दिवसभर व्हायचे. यात त्या अडचणीतल्या शेतकऱ्याला मदत केली ही उपकाराची भावना नाही; तर त्याने इर्जिक घातले आहे आणि आम्ही ते आनंदाने खायला आलो आहोत, ही भावना असायची. उन्हाळ्यात नांगरटीची अडचण असो, पावसाळ्यात पेरणीची, सुगीत पीककाढणीची; या सर्व काळात ज्याला जी अडचण असेल, मजुरांना द्यायला पैसे नसतील अशा शेतकऱ्याकडे असे इर्जिक घातले जायचे. सुगीत तर काढणीच्या वेळचा जल्लोष अधिक चैतन्यमय असायचा. यातून त्या शेतकऱ्याचे दु:ख हलके व्हायचे.

आपल्या संकटात आपण एकटे नाहीत, आपल्या पाठीशी गाव आहे- ही गोष्टच या पद्धतीत दिलासा देणारी असते. आज पंतप्रधान किंवा मुख्यमंत्री निधीतून किंवा समाजोपयोगी कामे करणाऱ्या संस्थांकडून आर्थिक मदत मिळाली, तर त्याची अडचण कमी होऊ शकते, पण या संकटाने त्याला आलेली निराशा, एकलेपण कमी होऊ

शकत नाही. इर्जिकसंस्कृती गेली आणि एकलेपणाच्या भावनेतून या आत्महत्या होतात किंवा त्या बाबतीतल्या अनेक कारणांपैकी एक कारण हेही असावे, असे मला वाटले.

**प्रश्न :** ग्रामसंस्कृतीतल्या बदलांचे परिणाम इतके क्लेशदायक आहेत असं तुम्हाला म्हणायचं का?

– तसं म्हणायचंय. कोणतीही संस्कृती बदलते, तेव्हा जीवनपद्धतीही बदलते. बदलत्या जीवनपद्धतीत पहिल्या गोष्टींना आपण कोणते पर्याय दिले किंवा शोधले, हे आपण विचारात घेत नाहीत. यात माणूस म्हणून त्या माणसाचा विचार किती होतो, हे पाहिले पाहिजे. ग्रामसंस्कृती, आदिवासींची संस्कृती म्हणजे समूहमनाचा आविष्कार आहे. हे सामूहिकपण भंगले की, ही माणसं स्थलांतरित होतील किंवा उद्ध्वस्त होतील. येत्या काही वर्षांत आदिवासींसंबंधी हेच चित्र आपणास दिसेल. हे समूह इतके सुटे होत जातील की, ते एक-एकट्याचे होतील. आर्थिक मदत हा एकमेव पर्याय नाही, त्यांची बदलत्या संस्कृतीतली मानसिकता सांभाळणे, हा प्रश्न आहे, असे निदान मला वाटते.

**प्रश्न :** ‘इर्जिक’मध्ये एवढेच नाही, ग्रामसंस्कृतीतील अनेक गोष्टींना तुम्ही स्पर्श केला आहे, तसं तर पारंपरिक साच्यात बसणारं इर्जिक नाही, त्यासंबंधी...

– हो, एका अर्थाने हे कोणत्याही विशिष्ट पारंपरिक वाङ्मयप्रकारात मोडणारे पुस्तक नाही. परंपरा, समकालीन घडामोडी, साहित्य, मानववंशशास्त्र, तत्त्वज्ञान, कला यांचे एकत्र रसायन या पुस्तकात आहे. तुम्ही ग्रामजीवनातून भूमी आणि निसर्ग अलग करू शकत नाही. त्याचे महत्त्व गाव सोडल्यावर झालेल्या वाचनातून माझ्या लक्षात आले की– अरे, आपण जे जीवन इथे जगलो किंवा आजही जगत आहोत; ते म्हणजे केवळ निसर्ग नाही, तर ते एक महाकाव्य आहे. त्यामुळे गतकालीन जीवन वा आठवणी सांगण्याऐवजी मी त्यात आजच्या आधुनिक साहित्याचे बीज कसे दडले आहे, ते सांगण्याचा प्रयत्न केला आहे. तर जुन्या गोष्टींचे समकालीन परिस्थितीत काय स्वरूप आहे, ते सांगण्याचा प्रयत्न केला आहे. कृषिसंस्कृती आणि तिच्या उपसंस्कृतीत दडलेल्या अनंत गोष्टींपैकी इथे काही थोड्याच सांगता आल्या. तुम्ही म्हणाला तसे हे पारंपरिक वाङ्मयप्रकारात बसणारे पुस्तक नाही, हे खरं आहे. ललित लेख, कृषिसंस्कृतीविषयक लेख, रीती-रिवाज, परंपरा यांचा शोध घेणाऱ्या लेखांप्रमाणेच आजच्या गावगाड्यासंबंधी, समाजव्यवस्थेविषयी लिहिले आहे.

**प्रश्न :** पुस्तकाच्या प्रस्तावनेत श्री.द.ता. भोसले यांनी तुमच्या वाचनाचा उल्लेख केला आहे. तुम्ही म्हणता, हे पुस्तक माझ्या गतजीवनाशी जोडलेले आहे. तुमच्याजवळ पुस्तकप्रेम आहे तसेच भूमिप्रेमही दिसते. हे वाचन आणि तुमचे गतकालीन अनुभव यांच्या संबंधातून हे लेख लिहिले आहेत. त्यासंबंधी आणखी काही सांगाल?

– सांगतो. हे वाचन म्हणजे केवळ पुस्तकांचे नाही. मी नेहमी म्हणतो, आयुष्यात मी पहिली कविता वाचली ती बिनअक्षरांची, बिनशब्दांची. एका अर्थाने मी भाग्यवान आहे की, दोन नद्यांच्या तीर्थस्थान नसलेल्या संगमावर मला वाढता आले. हजार वर्षांचा ऐतिहासिक वारसा असलेल्या गावाने मला खूप काही दिले आहे. एरवी भकास आणि पडझड झालेल्या उद्ध्वस्त गावात मला हजार वर्षांतली माणसं भेटतात असे भास होतात. त्या नदीकाठच्या सतींच्या समाध्यांतून त्यांची मौनाची भाषा समजून घेत आलो, नदीच्या काठी वाढण्याचा अनुभव एक वेगळाच असतो. ते नाद, ते गंध, ते स्पर्श, ते आवाज आजही कानांत आहेत. मी अगोदर म्हटल्याप्रमाणे सृष्टीचे एक महाकाव्यच मी जगलो. महाकाव्य कथा-कादंबरीसारखे नसते, त्यात असते समग्र विश्वदर्शन. माणूस, देव, दानव, भुतेखेते, जंगल, अरण्य, पशू, पक्षी, पंचमहाभूते अशा अनेक गोष्टींनी ते परिपूर्ण असते. पशुधन हे तर ग्रामजीवनाचे एक बलस्थानच. गाय, बैल, शेळ्या, कुत्री, मांजरी, नाग, साप असे किती तरी प्राणी हे केवळ अवती-भोवती नसतात, तर तिथला जगण्याचा एक भागच असतो. श्रद्धा, समजुती, परंपरा, जगण्यातले अध्यात्म, पूजा-विधी, सण-उत्सव, यात्रा-जत्रा यांतून ते वेगवेगळ्या पद्धतीने डोकावत असते. हे जीवन म्हणजे या सर्वांविषयींची ग्रामजीवनात जी कृतज्ञता असते, त्या कृतज्ञतेचेच हे पुस्तक आहे.

**प्रश्न :** ते ठीक; पण हे कसे मांडता आले?

– ते मांडता आले, कारण ते मी अनुभवले, त्यामुळे राना-वनात राहणे झाले, सुगीच्या दिवसांत मुक्काम झाले, रानातल्या गड्यामाणसांबरोबर मी शेतीतली सगळी कामं सुट्टीच्या काळात केली. नांगरणी, कोळपणी, राखणी, काढणी, मोडणी, पाणी देणे, खताच्या वा कडब्याच्या गाड्या वाहणे, कडब्याच्या गंजी रचताना गंजाड्याच्या हाताखाली कामं करणं, गाईंच्या धारा काढणं– अशी किती तरी. कोवळ्या मुलाला वडिलांनी सारखं कामाला लावणं हे अनेकांना आवडत नव्हतं. पण त्या काळात ती पद्धतच

होती. शिवाय वडिलांना वाटायचे, हा मोकळा गावभर फिरत राहिला तर बिघडायचा. आणि दोन पैसेही वाचायचेच ना! त्याचीही गरज होतीच. ही सगळी कामं करताना मी त्या भूमीशी इतका एकरूप होऊन गेलो की, पुढे मला त्याची सवयच लागली. मीच स्वत: कामं करू लागलो. वेळ मिळाला तर आजही करतो.

माझे वडील कडक शिस्तीचे आणि वडिलांच्या उलट आईचा स्वभाव होता. ती अतिशय धार्मिक वृत्तीची होती. अशिक्षित होती, पण पोथ्या व स्तोत्रे वाचू शकायची. ती सुंदर चित्रे काढायची, रांगोळ्या काढायची. प्रत्येक सणावाराला भिंतीवर ती अशी चित्रे काढायची. तिचे रंग म्हणजे त्या काळात मिळणाऱ्या विविध रंगांच्या शाईच्या पुड्या किंवा चुना आणि रांगोळी. हे सगळे करताना अनेकदा मी तिला मदत करत असे. त्या-त्या संकल्पनांचा अन्वयार्थ मी ह्या लेखांतून मांडला आहे. आईमुळे मला धार्मिक ग्रंथांचे वाचन करायची गोडी लागली. मला सतत वाटते की- आपण ज्याला धार्मिक साहित्य म्हणतो, ते सश्रद्ध भावनेने वाचू नये आणि नास्तिकतेच्या भावनेतूनही. श्रद्धा आणि नास्तिकता यातून अलिप्त होऊनच वाचले तर लक्षात येईल की, आधुनिक साहित्याची बीजे त्यात आहेत. याशिवाय त्यात मला स्त्रीवाद दिसला, मार्क्सवाद दिसला, गूढवाद दिसला, आइन्स्टाईन दिसला, जगण्याच्या प्रेरणा दिसल्या. आधुनिक कवींशी किंवा लेखकाशी ते संदर्भ जुळवता आले. हे सगळे तुम्हाला वेगवेगळ्या लेखांतून दिसेल.

**प्रश्न :** शेतीतला अनुभव आणि घरातले संस्कार यांच्या जोडीला शहरानं तुम्हाला काय दिलं?

- हो तर! मला उत्तम शिक्षक मिळाले. प्रकाशक झाल्यावर ज्यांचा सहवास मला मिळाला, ते मराठीतील अतिशय समर्थ लेखक होते. त्यापैकी डॉ.रा.चिं. ढेरे, व्यंकटेश माडगूळकर, डॉ.व.दि. कुलकर्णी, डॉ.द.भि. कुलकर्णी, डॉ.गणेश देवी अशी आणखी काही नावे घेता येतील. ज्यांची पुस्तके मी प्रकाशित करू शकलो नाही, अशाही काही श्रेष्ठ लेखकांबरोबर माझा संबंध राहिला. त्यांच्याशी वेळोवेळी झालेल्या चर्चा, गप्पा म्हणजे माझ्यासाठी मोठी मिळकतच ठरली.

अण्णा म्हणजे डॉ.रा.चिं. ढेरे आणि डॉ.द.भि. कुलकर्णी यांचा दीर्घ काळ म्हणजे जवळजवळ वीस-बावीस वर्षांचा सहवास मिळाला. मी लिहिते रहावे यासाठी तेही आग्रही होते. त्यांनी केलेल्या ज्ञानसंस्काराची परतफेड मला करता येणार नाही. अण्णांनी त्यांच्या विविध प्रकल्पांसाठी वापरलेल्या संशोधनपद्धती मी जवळून पाहिल्या, त्या जाणून घेण्याचा प्रयत्न केला. त्यांनी मराठीत देवताविज्ञान आणि इतर ज्ञानशाखा किती समृद्ध केल्या, हे आपण जाणतोच. त्यांच्या संशोधनपद्धतीत त्यांनी मिथकशास्त्राचा उपयोग करून विषयाची सुसूत्र मांडणी केली आहे. इर्जिक हे पुस्तक म्हणजे कृषिसंस्कृतीतील मिथकांचा अन्वयार्थ लावण्याचा मी प्रयत्न केला आहे. अर्थात माझ्या मर्यादा आणि कॉलमची शब्दमर्यादा यामुळे त्यात काही न्यूनता राहू शकते. पण हा संस्कार तर अण्णांचाच. साहित्यशास्त्र, कवी, कविता याविषयी दभिसर भरभरून बोलत असत. एका अर्थाने त्यांच्या मार्गदर्शनाखाली माझी ज्ञानसाधना चालू होती. यासाठी काही त्यांची शिकवणी नव्हती. सहवासाने भाग्य बदलते असे म्हणतात, याची प्रचिती मी घेतली. हे पुस्तक मी अण्णांनाच अर्पण केले आहे आणि आता हा पुरस्कारही. अण्णांमुळे धर्माचे समाजशास्त्र जाणून घेण्याचा मी प्रयत्न करत आलो.

**प्रश्न :** आजच्या राजकारणाने ग्रामजीवन उद्ध्वस्त झाले आहे, हे तुम्ही म्हणता. तुमचा आज अनुभव तसं सांगतो का? अजून शेताशी संबंध टिकला आहे का? त्या लेखासंबंधी काही सांगता येईल?

आजही मी शेती करतो आणि गावाशी व त्यातील घडामोडींशी माझा संबंध आहे. आज तरी राजकारणामुळे ग्रामीण जीवनाच्या सर्वांगीण मूल्यात्मक अध:पतनाचे भेसूर चित्र दिसत आहे. गावातील बदलत जाणारे हे वास्तव आता नागरिकीकरण आणि गुंडगिरीकडे चालले आहे. नदीतून उपसल्या जाणाऱ्या वाळूमुळे केवळ नदी वा पर्यावरण उद्ध्वस्त होत नाही, तर तिथे वाळू माफियांच्या टोळ्यांची दहशतही आहे. हे खूप भयावह आहे.

**प्रश्न :** जाखडे, आता तुमच्या इतर लेखनाविषयी. उत्कृष्ट वाङ्मयासाठी तुम्हाला राज्य शासनाचे पुरस्कार तीन वेळा मिळाले आहेत आणि इतर अनेक प्रतिष्ठित साहित्यसंस्थांचेही. तुम्ही विज्ञानलेखनही केले आहे. या लेखनासंबंधी काही सांगाल?

- हे लेखनही ग्रामजीवनाशी निगडितच आहे. माझ्या 'पाचरूट' कादंबरी ऊसशेतीतून निर्माण झालेले प्रश्न चितारणारी आहे. ऊसतोड कामगारांबद्दल आपणा सर्वांना सहानुभूती आहे. पण १९८८ ते जवळजवळ २०१० पर्यंत त्यांनीही शेतकऱ्यांचे शोषण केले आहे, तेही मी त्या कादंबरीतून मांडले आहे. पाचरूट एक घटितनिष्ठ कादंबरी

आहे. या कादंबरीला काही संस्थांचे पुरस्कार मिळाले. अहमदनगर आकाशवाणीवर तिचे दोनदा वाचनही झाले. ‘गावमोहर’ ही माझी कुमारांसाठी लिहिलेली पण इतरांनीही वाचावी अशी छोटी कादंबरी. तात्यांना- व्यंकटेश माडगूळकरांना ती खूप आवडली होती. या पुस्तकाला म.सा.प. पुणे आणि म.रा. शासनाचे पुरस्कार मिळाले होते. सई परांजपे यांना काही स्कूल डॉक्युमेंट्रीज बनवायच्या होत्या, तेव्हा तात्यांनी ही कादंबरी त्यांना सुचवली होती. ‘एक-एक काडी गवताची’ हा माझा कथासंग्रह ग्रामीण कथांचाच आहे. मी चार मोठ्या कंपन्यांतून धातुशास्त्र विभागात महत्त्वाच्या पदावर काम केले. शास्त्रशाखेचा विद्यार्थी आणि पुढे इंजिनिअरिंग विभागात काम करण्याची मिळालेली संधी यामुळे मी विद्यार्थ्यांसाठी ‘प्रयोगशाळेत काम कसे करावे?’ किंवा आपल्या रोजच्या जीवनातील, विशेषत: लोह किंवा लोखंडातील मिश्र धातूंविषयी मी अतिशय सोप्या व रंजनात्मक भाषेत लिहिले आहे. लोहाची गुणवत्ता वाढवण्यासाठी अनेक धातूंचा कसा उपयोग होतो, ते मी ‘लोहमित्र धातू जिंदाबाद!’ या पुस्तकातून सांगितले आहे.

**प्रश्न :** तुमच्या भाषेच्या प्रकल्पाविषयी?

- मला वाटते, हे माझ्या हातून मोठे आणि भक्कम काम झाले आहे. याचे सर्व श्रेय डॉ.गणेश देवी यांनाच. ब्रिटिश राजवटीत झालेल्या सर्वेक्षणानंतर जवळजवळ शंभर वर्षांनंतर सरकारच्या मदतीशिवाय लोकांच्या सहभागातून केलेल्या भारतीय भाषांच्या लोकसर्वेक्षणात मी महाराष्ट्रातील भाषांच्या खंडाची जबाबदारी स्वीकारली. हा प्रकल्प संपूर्ण भारतभर एकाच वेळी चालू होता. त्यामुळे विविध राज्यातील भाषावैज्ञानिक, भाषांचे जाणकार, भाषाप्रेमी लोक परिचयाचे झाले. राष्ट्रीय प्रकल्पात काम करताना येणारा अनुभव फारच वेगळा असतो. यामुळे मला महाराष्ट्र आणि भारत खऱ्या अर्थाने समजला. विविध समाजघटकांशी, जाती-जमातींशी संबंध आले. बहुजनांच्या भाषांना प्रतिष्ठा देणाऱ्या या प्रकल्पाची नोंद भारत सरकारने घेऊन डॉ.देवी यांना ‘पद्मश्री’ दिली. युनेस्कोनेही प्रकल्पाची नोंद घेतली. मलाही या महाराष्ट्राच्या खंडासाठी म.रा.शासनाचा पुरस्कार मिळाला.

**प्रश्न :** पण ‘इर्जिक’ या पुस्तकाचे स्वागत कसे झाले?

- लोकमान्य टिळक स्मारक वाचनालय- चिपळूणचा पुरस्कार या पुस्तकास मिळाला. कॉलम संपल्यानंतर २००९ मधील वृत्तपत्रातील उत्कृष्ट कॉलमसाठी म.सा.प. पुणे आणि मराठी वृत्तपत्र लेखक संघ- मुंबईचा पुरस्कार मिळाला. डॉ.अशोक केळकरांसारखे भाषातज्ज्ञ आणि डॉ.भालचंद्र नेमाडेसर यांचे पत्र, हेही मोठे पुरस्कारच म्हणावे लागतील. नेमाडेसर या पत्रात म्हणतात, ‘इर्जिकचे वाचन करताना माझे सिमल्यातले दिवस आनंदात गेले. तुमच्या लेखामध्ये ठासून मांडलेल्या देशी वृत्तीबद्दल मला इकडे वाचत असताना वाटणारा अभिमान कळवला पाहिजे. ही अजून आधार देणारी गावाकडची मूल्ये तुम्ही अत्यंत समर्थपणे मांडली आहेत.’

**प्रश्न :** प्रकाशन आणि लेखन या दोन्ही बाजू सांभाळताना कोणती कसरत होते? सध्या काही लिहिता का?

- खरं सांगू, या दोन्ही गोष्टी माझ्या प्रेमाच्या आहेत. त्यामुळे त्यात नाही कसरत किंवा काही कष्ट वाटत. पण इतरांचे नवे कपडे शिवणाऱ्या शिंप्याला स्वत:च्या फाटक्या पायजम्याला टीप मारायला उसंत मिळत नाही, तसे माझे झाले आहे. इतरांची पुस्तके प्रकाशित करताना माझी पुस्तके तशीच राहिली आहेत. लेखनाचे अनेक प्रकल्प माझ्यासमोर आहेत. केल्याशिवाय सांगू नये, या उक्तीप्रमाणे ते मी आता जाहीर सांगत नाही. पण वेळोवेळी प्रसंगानुसार लिहिलेल्या किंवा केलेल्या लेखनातून माझी पाच-सहा पुस्तके प्रकाशित होऊ शकतात. फक्त त्या लेखनाचे व्यवस्थित व्यवस्थापन व संपादन करायला फुरसत मिळायला हवी.

**प्रश्न :** तुम्ही ‘पद्मगंधा प्रकाशना’ला वाङ्मयीन प्रतिष्ठा दिली आहे. प्रकाशक म्हणून तुमची भूमिका थोडक्यात सांगाल?

- प्रकाशन ही गांभीर्याने करायची गोष्ट आहे, याचे भान मी प्रथमपासून ठेवले आहे. प्रकाशन संस्था म्हणजे विद्यापीठाच्या प्रतिकृती ठराव्यात, असे मला वाटते. समकालीन संस्कृतीचे सुईणपण करण्याचा आनंद प्रकाशकांना मिळतो, तसा मला मिळाला. त्यातून मी स्वत:ला पुस्तक प्रकाशक न समजता ग्रंथ प्रकाशक समजतो. वाचकशरणता न स्वीकारता मी काम करत आलो. यामुळे व्यावहारिक यश मिळाले नसले तरी दीर्घजीवी ग्रंथांचे प्रकाशन मी केले. आजही मी शेती करतो. शेती आणि प्रकाशन-लेखन यात नवसर्जनाचा आनंद दडलेला आहे.

**- अरुणा ढेरे**



# ललित ग्रंथ पुरस्कार : विरंगी मी, विमुक्त मी

## अंजली जोशी

anjaleejoshi@gmail.com
Mob. : 9820437851

**संवादक : संध्या टाकसाळे**

महाराष्ट्रात आणि एकूणच मराठी साहित्य संस्कृतीच्या क्षेत्रात ऐहिक व उदार विचारांचे वारे अधूनमधून घोंघावत असतात. त्याच प्रक्रियेचा भाग म्हणून स्त्रियांचे प्रश्न, स्त्री-स्वातंत्र्य, स्त्री-पुरुष समता, स्त्रियांचे शोषण यांची चर्चा सतत या ना त्या स्वरूपात होत असते. तरीही अनेक विषय असे असतात, ज्याला हात घालायला 'पुरोगामी' म्हणवणारेही भितात किंवा संकोच करतात. कारण ते विषय हाताळण्यासाठी आवश्यक असणारा आवाका किंवा निर्भीडता त्यांच्याकडे नसते. असा आवाका आणि निर्भीडता, शिवाय त्याच्या जोडीला भाषेची व विचारप्रतिपादनाची हातोटी असणारी ही लेखिका आहे. वरील सर्व गुणांचा आविष्कार 'विरंगी मी, विमुक्त मी' या कादंबरीत आहे.



अंजली जोशी म्हणजे अनेक विषयांत रस, गती आणि आवाका असलेलं व्यक्तिमत्त्व. मानसशास्त्र आणि मनोचिकित्सा हा त्यांचा अभ्यासाचा विषय. त्यात त्या डॉक्टरेट आहेत. मुंबईच्या वेलिंगकर शिक्षणसंस्थेत त्या पूर्णवेळ प्राध्यापक असून तिथे एच.आर. म्हणजे मनुष्यबळ विकास व्यवस्थापन हा विषय शिकवतात. त्यासंबंधी अनेक प्रकल्प, कार्यशाळा, विविध कंपन्यांमध्ये प्रशिक्षण कार्यक्रम हे सतत चालू असतं. मानसशास्त्रविषयक एका आंतरराष्ट्रीय जर्नलच्या संपादक मंडळावर त्या आहेत. अनेक शोधनिबंध त्यांनी सादर केले आहेत. याशिवाय मानसिक अस्वास्थ्य आणि समस्या असलेल्या व्यक्तींना त्या समुपदेशन करतात. याला जोडूनच REBT (Rational Emotive Behavior Therapy) म्हणजे विवेकनिष्ठ मानसोपचारशास्त्र यावर कार्यशाळा घेतात. एवढं सगळं करूनही त्या भरपूर लेखन करतात. चकित व्हावं एवढा हा कामाचा झपाटा आणि उरक आहे. शिवाय लेखनही मनापासून केलेलं आणि कसदार! 'अल्बर्ट एलिस' या त्यांच्या चरित्रात्मक कादंबरीच्या गेल्या चार वर्षांत तब्बल दहा आवृत्त्या प्रसिद्ध झाल्या, एवढं पुरावा म्हणून मी सांगितलं तरी पुरे! डॉ.कि.मो. फडके हे अंजलीचे गुरू आणि थेट अल्बर्ट एलिस यांच्याशी पत्रव्यवहार असलेले मानसशास्त्रज्ञ. त्यांच्याबरोबर 'अल्बर्ट एलिस : विचार-दर्शन' हे पुस्तकही अंजली जोशी यांनी लिहिलं आहे. शिवाय, अनेक आई-बाबांचा जो जिव्हाळ्याचा विषय आहे, त्यावरचं 'विवेकी पालकत्व' हेही त्यांचं आणखी एक पुस्तक!

माझी आणि अंजली जोशींची ओळख झाली ती या विवेकी पालकत्वामुळेच. त्या वेळी मी 'साप्ताहिक सकाळ'ची सहसंपादक होते आणि अंजली जोशी नुकत्याच लिहू लागल्या होत्या. पालकत्व या विषयावर दोन-तीन लेख त्यांनी आमच्याकडे पाठवले. लेखनात नक्कीच चमक होती आणि मानसशास्त्राच्या गाढ्या अभ्यासामुळे विषयावरची पकड मजबूत होती. पण ते लेख जसेच्या तसे छापावेत असे परिपूर्णही नव्हते. वाचकांसाठी लिहिताना कशा पद्धतीनं लिहावं लागेल, वाचकांना नेमकं काय हवं असतं, विषयाची मांडणी रोचक कशी करता येईल यावर आम्ही सविस्तर बोललो. आणि थोड्याच दिवसांत आश्चर्य वाटावं इतका सुंदर, नेटका आणि नेमका हवा तसा लेख समोर हजर झाला. अंजली जोशींचं वेगळेपण तिथेच लक्षात आलं. काय हवं आणि कसं हवं, हे सांगितल्यावर ते तंतोतंत उतरवण्याची, लेख अर्थपूर्ण आणि शिवाय रंजक करण्याची हातोटी त्यांच्यात आहे. खूप कमी लोकांना एवढ्या झटकन ते जमतं. लेखनाचं मर्मच त्यांना कळल्याचं ते लक्षण होतं. मग आधी लेख, त्यानंतर सदर असा सिलसिला सुरू झाला. वेगवेगळ्या क्षेत्रांतील लोकांशी भेटीगाठी आणि चर्चा करायला मिळणं, हा पत्रकारितेत काम करण्याचा एक मोठा फायदा असतो. त्यातल्या काहींशी तर मस्त सूर जुळतात. अंजली जोशींच्या

# लेखकानं निर्भीड आणि ठाम असायलाच हवं!

मला या कादंबरीची नायिका उथळ
किंवा सनसनाटी रंगवायची नव्हती.
मग तिच्या जीवनातले दोन महत्त्वाचे प्रवाह
मी शोधायला सुरुवात केली.
चित्रकलेचं तिचं शिक्षण आणि
स्त्री-चळवळ. माझ्या मनात अशी नायिका
साकार होऊ लागली जिचं बेटीशी
साधर्म्य आहे, पण तिचं जीवन तंतोतंत
बेटीसारखं नाही. मग मी बेटीच्या
जीवनातल्या काही घटना घेतल्या
आणि तिचा वैचारिक,
भावनिक प्रवास मात्र कल्पनेनं रंगवला.

बाबतीत असंच घडलं. फोन, प्रत्यक्ष भेटी यातून संवाद फुलत गेला. (आणि आजही, म्हणजे ते सदर केव्हाच संपून गेल्यानंतर आणि मी साप्ताहिक सकाळमधून बाहेर पडून सात वर्षे झाल्यावरही तो सुरू आहे.) त्यांचं प्रसन्न व्यक्तिमत्त्व, मृदू भाषा, त्यांचं लेखन याचा त्यात मोठा वाटा आहे, हे निश्चित!

'विवेकी पालकत्व' हे सदर त्या वेळी प्रचंड गाजलं. वाचकांचा मोठा प्रतिसाद मिळाला. विषय जिव्हाळ्याचा होता हे तर एक कारण आहेच, पण त्याचबरोबर अंजली जोशींनी मांडलेला आशय आणि तो लिहिण्याची पद्धत, शैली यामुळेही ते घडलं. विषयच असा होता की, उपदेशपर लेखात त्याचं रूपांतर होणं सहज शक्य होतं; मात्र त्यांनी विविध घाट हाताळून ते होऊ दिलं नाही. उदाहरणार्थ- काही लेख त्यांनी संवादातून पुढे नेले, कधी विक्रम-वेताळाच्या गोष्टीसारखी गोष्ट सांगितली, कधी अकबर-बिरबल संवादातून लेख उलगडत गेला तर कधी जंगलातली अनोखी गोष्ट वाचकांच्या पुढे आली. चांगला लेखकच हे करू शकतो.

त्यानंतरही त्या लिहीत असलेलं सगळं मी वाचत होतेच आणि मग गेल्या वर्षी दोन दिवाळी अंकांत आताच्या या 'विरंगी मी...'चे दोन भाग आले. वाचताक्षणीच 'अरे व्वा!' आणि 'अरे बापरे!' अशा दोन्ही प्रतिक्रिया एकाच वेळी तोंडून बाहेर आल्या. एकाच श्वासात या दोन प्रतिक्रिया मिळवणारी पुस्तकं दुर्मिळ!

ही कादंबरी आहे 'लैंगिक मुक्ती हा स्त्रियांच्या मुक्तीचा केंद्रबिंदू आहे' असं धाडसानं मांडणाऱ्या बेटी डॉडसन हिच्या जीवनावर. बेटी ही अमेरिकेतील चित्रकार आणि स्त्रीमुक्तीच्या चळवळीतली एक कार्यकर्ती. आपल्याकडल्या र.धों. यांच्या विवेकवादाशी थेट नातं सांगणारी. तिच्यावरील कादंबरीचा विषय स्त्रियांच्या हस्तमैथुनाचा पुरस्कार करणारा. त्यामुळेच या संपूर्ण लिखाणाची प्रक्रिया काय होती, अवघड वळणं काय आली, हे जाणून घेण्याची खूप उत्सुकता होती.

**प्रश्न :** 'विरंगी मी...'मध्ये मांडलेला विषय महत्त्वाचा नक्कीच आहे; मात्र स्त्रियांची लैंगिकता आणि हस्तमैथुन अशा विषयावर बोलणं-लिहिणं आपल्याकडे शिष्टसंमत मानलं जात नाही. जरुरीचं तर असतं, पण 'अळीमिळी गुपचिळी' असा कारभार! लिहिताना काय भावना होती तुमच्या मनात? भीती, की अशा विषयावर लिहू की नको असं द्वन्द्व?

– खरंच सांगते, लिहू की नको असं नाही वाटलं एकाही क्षणी. या विषयावर लिहिलंच पाहिजे, या धारणेतून लेखन झालं. असे विषय हाताळण्यातले धोके आणि अवघड वळणे माहीत होती पण लिहिण्याची धारणा इतकी प्रबळ होती की, तिनं लिहिण्याचं धैर्य दिलं. या लेखनाद्वारे आपण या विषयाला न्याय देत आहोत, ही समाधानाची भावना होती. त्याबद्दल आत्मविश्वास होता. लेखकानं असं निर्भीड आणि ठाम असलंच पाहिजे; नाही का?

समुपदेशन करताना ज्या केसेस मी हाताळत होते, त्यातून अशा विषयाची गरज तीव्रपणे वाटत होती. लैंगिकतेचा नीतिनिरपेक्ष भूमिकेतून विचार केला पहिजे, असं मला प्रकर्षानं वाटू लागलं. अल्बर्ट एलिस यांनी कामप्रेरणेवर बरंच लिखाण केलं आहे. त्यांचं एक पुस्तक वाचताना बेटी डॉडसनचा संदर्भ माझ्या वाचनात आला. तिचे विचार जेव्हा ऐकले तेव्हा वाटलं- आपल्याकडे स्त्रियांचा जो लैंगिक कोंडमारा होतो, त्यांच्यापर्यंत हे पोचायला हवं. काहींची लग्नं उशिरा होतात, काही घटस्फोटित असतात, विधवा असतात. जोडीदार नसताना स्त्रिया कामपूर्ती कशी करत असतील, याचा फारच क्वचित विचार केला जातो. लग्न झालेल्या काही जोडप्यांमध्ये लैंगिक अनुरूपता नसते. पण अनेक कारणांमुळे एकमेकांना सोडायचंही नसतं. काही जण पन्नाशीनंतर लैंगिक जीवनाला राम राम ठोकतात. त्या वेळी अपराधमुक्त हस्तमैथुन हा पर्याय असू शकतो. पण लक्षात घ्या- 'पुरुष नकोच' अशी ही विचारसरणी नाही. केवळ या कारणासाठी विजोड पुरुषाच्या मागे फरपटत जायची गरज नाही, हा त्यातला भाग आहे. नैसर्गिक उर्मी तुम्ही मारल्यात, तर त्याचे मनावर घातक परिणाम होऊ शकतात. पुढचा महत्त्वाचा भाग असा की, दुसरीकडे संबंध ठेवायची इच्छा नसलेल्यांना हा मार्ग हिताचा ठरू शकतो. लैंगिक भावनांचं दमन केल्यामुळे, त्या दडपल्यामुळे paranoia सारखे विकार होतात, हे मी बघितलेलं आहे.

र. धों. कर्व्यांचा माझ्यावर बराच प्रभाव आहे. त्यांच्या संपादित खंडांची मी अक्षरशः पारायणं केली आहेत. एवढ्या वर्षांपूर्वी ज्या पद्धतीनं ते लिहीत होते, ते हादरवून टाकणारं आहे. पण दुर्दैवाची गोष्ट अशी की, अजूनही परिस्थिती तशीच आहे. त्यामुळे लिहायला तर हवंच, असं वाटलं.

**प्रश्न :** लिहू की नको असं नाही वाटलं, त्या बाबतीत

तुम्ही ठाम होतात. पण जे लिहिलंय ते वाचक कसं स्वीकारतील, काय म्हणतील- याचं दडपण आलं होतं का?

– आपण काय लिहिलं म्हणजे वाचक स्वीकारतील याचं उत्तर कुठलाही लेखक देऊ शकत नाही. ती आपल्या नियंत्रणाबाहेरची गोष्ट आहे. त्यामुळे मग मला काय म्हणायचं आहे (म्हणजे जे माझ्या नियंत्रणात आहे) ते जास्तीत जास्त प्रभावीपणे मांडण्यावर मी लक्ष केंद्रित केलं. हे लिखाण जे स्वीकारणार नाहीत, त्यांना ते न स्वीकारण्याचं स्वातंत्र्य आहे; हे एकदा मान्य केलं की, मग दडपण कमी होतं. शिवाय वाचकांच्या प्रगल्भतेवर माझा विश्वास आहे. त्यातूनही काही लोक वेडं-वाकडं म्हणाले, तर ती त्या वाचकांची अपरिपक्वता असेल. त्याचं ओझं मी का घेऊ?

आणखी काही धोके जरूर जाणवत होते. ते असे की- तुमच्यावर शिक्का बसतो की, 'ही लेखिका म्हणजे असलंच' लिहिणारी. किंवा काही जण तर थेट तुमच्या व्यक्तिगत जीवनाशीच संबंध जोडायला बघतात. म्हणजे यांच्याही वैयक्तिक जीवनात हेच आहे की काय?

**प्रश्न :** मग आता लिहिल्यावर काय प्रकारचा प्रतिसाद मिळतो आहे? स्त्रियांच्या प्रतिक्रिया वेगळ्या, पुरुषांच्या वेगळ्या- असा काही फरक जाणवला?

– प्रतिसाद चांगला आहे. पण स्त्री-पुरुष असा काही फरक नाही जाणवला. वाचकांच्या मते याला सामाजिक मूल्य आहे. काहींनी २०-२५ प्रती घेऊन त्या भेट दिल्या, तर काहींनी हे पुस्तक वाचून आमच्या कामजीवनात सुधारणा झाली, असंही सांगितलं.

पण काही प्रतिक्रिया मात्र गमतीदार म्हणा किंवा वास्तवाची जाणीव करून देणाऱ्या होत्या. आम्हाला पुस्तक आवडलं, पण हे कुणाला भेट म्हणून द्यायला मात्र आम्हाला संकोच वाटेल.

**प्रश्न :** स्वतःबद्दलची इतकी खात्री- जे सांगायचं आहे त्याबद्दल ठाम असणं, लोक काय म्हणतील याचं ओझं न बाळगणं- या गोष्टी सुरुवातीपासूनच आहेत का तुमच्या व्यक्तिमत्त्वात?

– छे-छे, मुळीच नाही. कोण काय म्हणेल या गोष्टीचा पूर्वी खूप त्रास करून घ्यायची मी. पण मानसशास्त्राच्या शिक्षणामुळे स्वतःवर उपाय करू शकतो आपण. त्या अभ्यासानं मला एन्लायटन झाल्यासारखं वाटलं. मुख्य म्हणजे मोकळेपणा आला. मला स्वतःला चळवळ, बंडखोरी अशी काहीही पार्श्वभूमी नाही. एका मध्यमवर्गीय, धार्मिक कुटुंबात मी जन्मले. पूर्वी छोट्या-छोट्या गोष्टीतून गिल्ट यायचा. भाजी बरी नाही झाली, आला गिल्ट. अरेच्चा! करपलं वाटतं काही तरी, लागली टोचणी. आता मात्र स्वतःला माफ करायला शिकले आहे. 'सुपर वुमन' ही संकल्पना मानसिक स्वास्थ्यासाठी मुळीच चांगली नव्हे. पण याचा अर्थ मी कधीच अस्वस्थ होत नाही असा मात्र नाही. मी संवेदनाक्षम आहे. त्रास होतोच. मात्र पूर्वी मूळ पदावर यायला वेळ लागायचा, आता तो अस्वस्थतेचा कालावधी कमी झाला आहे.

**प्रश्न :** या पुस्तकाचा जो घाट तुम्ही निवडला आहे, तो वेगळा आहे. म्हणजे बेटीचं जगणं आणि कल्पित घटना यांची सरमिसळ करून ही कादंबरी आकार घेते. तो निवडण्यामागचं कारण काय होतं?

– ख्रिश्चॅनिटीचा कट्टर प्रभाव असलेल्या त्या काळात 'हस्तमैथुन' हा शब्द उच्चारणंही जिथे पाप समजलं जायचं, तिथे त्याचा प्रचार करण्याचं धैर्य बेटीनं कुठून गोळा केलं असेल, हे जाणून घेण्याची कमालीची उत्सुकता मला होती. तिच्या या कृतीमागे काही वैचारिक अधिष्ठान असेल, असा माझा कयास होता. मात्र मी जे तिच्याविषयी वाचलं, संशोधन केलं त्यातून तिची वैचारिक भूमिका, सुस्पष्ट विचारधारा, तिची तात्त्विक भूमिका काहीच हाती लागलं नाही. मला या कादंबरीची नायिका उथळ किंवा सनसनाटी रंगवायची नव्हती. मग तिच्या जीवनातले दोन महत्त्वाचे प्रवाह मी शोधायला सुरुवात केली. चित्रकलेचं तिचं शिक्षण आणि स्त्री-चळवळ. माझ्या मनात अशी नायिका साकार होऊ लागली जिचं बेटीशी साधर्म्य आहे, पण तिचं जीवन तंतोतंत बेटीसारखं नाही. मग मी बेटीच्या जीवनातल्या काही घटना घेतल्या आणि तिचा वैचारिक, भावनिक प्रवास मात्र कल्पनेनं रंगवला. चरित्रात्मक कादंबरी न लिहिता, वास्तव आणि कल्पना याची सरमिसळ करणारी कादंबरी हा घाट निवडल्यानं मी बरंच सर्जनशील स्वातंत्र्य घेऊ शकले आणि मला हवी तशी साहित्यकृती साकार झाली.

**प्रश्न :** ही कादंबरी वाचल्यावर एक गोष्ट लक्षात येते की, हे लिखाण म्हणजे एखाद्या ताणलेल्या दोरीवर चालण्यासारखे आव्हान होते. तोल जरा एका बाजूला गेला तर लिखाण अश्लील आणि सवंगतेकडे झुकू शकले असते. दुसऱ्या बाजूनं अगदी तटस्थपणे वर्णन करायचं ठरवलं असतं तर ते नीरस, गंभीर आणि पाठ्यपुस्तकी होऊ शकलं असतं. हे दोन्ही टाळून पुस्तक रसपूर्ण आणि वाचनीय झालं आहे. कसा सांभाळला हा तोल?

– लेखन आव्हानात्मक होतं, हे तर खरंच. मला कामुक कादंबरी बनवायची नव्हती, त्यामुळे मी उघड–उघड वर्णनं टाळली. कल्पिताचा फॉर्म वापरल्यानं काही गोष्टी चांगल्या पद्धतीनं उतरवणं शक्य झालं. पण त्यापलीकडे वेगळे असे काही प्रयत्न केले नाहीत. मला जे काही म्हणायचं होतं, ते पक्कं होतं आणि ते योग्य पद्धतीनेच वाचकांपर्यंत पोचलं आहे, असं दिसतंय.

**प्रश्न :** शिवाय काही चांगले मराठी शब्दही तुम्ही तयार केलेले आहेत. उदाहरणार्थ– पाकळी, गुद्‌गुली. प्रचलित अर्थांपेक्षा वेगळ्या अर्थानं ते तिथे येतात.

– भाषा समृद्ध व्हायची असेल तर आपण मराठी शब्द शोधून काढले पाहिजेत, रूढ केले पाहिजेत. माझ्या पुस्तकात काही इंग्रजी शब्दही आहेत, पण ते मराठी गंध आणि वळण घेऊन येतात. उमाताई कुलकर्णी यांनीही भाषेविषयी खूप चांगल्या सूचना मला केल्या.

**प्रश्न :** 'मी अल्बर्ट एलिस' या पुस्तकाची चार वर्षांत दहावी आवृत्ती निघाली. विवेकनिष्ठ मानसोपचारशास्त्र म्हणजे 'आरईबीटी' हे शास्त्र अल्बर्ट एलिस यांनी प्रवर्तित केलं. मानसिक आरोग्य संतुलित ठेवण्यासाठी ते जगभर वापरलं जातं. काय आहे या संकल्पनेतला मध्यवर्ती विचार?

– यातला गाभा असा आहे की, माणसाच्या भावनिक अस्वास्थ्याचं कारण त्याच्या मनातील तर्कदुष्ट, अविवेकी आणि अवास्तव विचारसरणीत असतं. आपण अस्वस्थ का होतो? तर आपला असा समज असतो की, बाह्य जीवनात काही घटना घडतात आणि त्या घटनांमुळे आपण अस्वस्थ होतो. मात्र ही पद्धती असं सांगते की– निव्वळ घटना हे कारण नाही, तर त्या घटनेकडे आपण कोणत्या नजरेनं–दृष्टिकोनातून बघतो, त्यातून अस्वस्थ भावना निर्माण होतात. म्हणजे अमुक एक घटना घडली म्हणूनच माझा तोल गेला, राग आला, त्रास झाला– असं आपल्याला वाटतं. असा विचार केला की, सगळी जबाबदारी त्या घटनेवर टाकून आपण थांबतो, passive होतो. हे अविवेकी आणि तर्कदुष्ट विचार ओळखायला, त्यांच्याशी सामना करायला 'आरईबीटी' शिकवते. विवेकनिष्ठ विचारानं हा सामना करता येतो. 'आरईबीटी' हे जीवन–तत्त्वज्ञान आहे. ते समजून घेऊन माणूस स्वतःच स्वतःवर उपाय करू शकतो.

**प्रश्न :** पालक आणि मुलं हा तुमच्या अभ्यासाचा विषय आहे. असं दिसतं की– सध्याचे पालक जागरूक आहेत– मुलांकडे खूप लक्ष देतात. त्यांच्यासाठी वाट्टेल ते करायला आणि हव्या त्या गोष्टी आणून द्यायला तयार असतात. त्यांच्या भावनिक गरजांकडे लक्ष पुरवतात. संवाद साधण्याचा प्रयत्न करतात. तरी या नात्यात आणि संगोपनात काही तरी बिनसत जातंय. तुम्हाला सगळ्यात मोठी उणीव कुठे दिसते?

– आजचे पालक नुसते जागरूक नव्हे, तर अतिजागरूक झालेत. मुलांच्या आयुष्याचं प्रत्येक मिनिट ते नियंत्रित करायला बघतात, त्यावर ताबा मिळवण्याचा प्रयत्न करतात आणि इथेच मग गाडं फसतं. एक लक्षात ठेवायला हवं की, प्रत्येक मूल स्वतंत्र असतं. ते सतत तुमच्या मनाप्रमाणे, तुम्हाला हवं तसंच नाही वागणार. मुलांच्या समुपदेशनाच्या केसेस हाताळताना लक्षात येतं की, अनेक बाबतीत पालकांच्याच डोक्यात घोळ आहेत.

अलीकडे 'हेलिकॉप्टर मॉम' अशी एक संज्ञा वापरली जाते. याचा अर्थ मुलांवर सतत, २४ तास लक्ष! मुलं जराही चुकू नयेत म्हणून जीवाचा आटापिटा करायचा. असं केलं तर आपण उत्तम पालक, असं त्यांना वाटतं. पण अशानं मुलांची वैचारिक वाढ खुंटते. सगळ्याच गोष्टी मुलांना जर आखून दिल्या, तर स्वतंत्र विचार करायला कशी शिकतील ती? त्यांचं त्यांना करून बघू देत, चुकू देत. शिकतील त्यांची ती आणि मग नीट विचारही करायला लागतील. बर्ट्रान्ड रसेलचं एक चांगलं वाक्य आहे. तो म्हणतो, 'तुम्ही मुलांना फक्त एकच गोष्ट सांगा– ती म्हणजे, एक माणूस म्हणून तू खूप चांगला/चांगली आहेस!' पण पालक ते करत नाहीत. ती एक चांगली व्यक्ती आहे, अशा भावना मुलांपर्यंत कधी पोचवत नाहीत. उलट, सतत तक्रार करत राहतात. मुलांकडे इतकं लक्ष देतात किंवा इतकं लक्ष ठेवतात की, मुलं मग बंडखोर होतात. तुमचं अजिबात ऐकेनाशी होतात.

मुलांवर पोलीसगिरी करू नका. संशय घेऊ नका. अनेक पालकांना धास्ती वाटते, पण मुलांवर विश्वास ठेवा. याचा अर्थ मुलांना वाऱ्यावर सोडा आणि शिस्त लावू नका, असा नाही. मुद्दा एवढाच की, हे सगळं भान ठेवून करा. कोणत्याही अर्थानं त्यांच्या व्यक्तिस्वातंत्र्यावर घाला घालू नका. मुलं नीट वागायला हवी असतील, तर पहिल्यांदा तुम्हाला बदलायला लागेल.

**प्रश्न :** सगळ्यात महत्त्वाचा प्रश्न– तुमच्याकडे बघितलं

की अनेक वेळा तो माझ्या मनात येतो. तो म्हणजे, एवढ्या कामासाठी तुम्ही वेळ कसा काढता? म्हणजे एक पूर्ण वेळ नोकरी आहे. संध्याकाळी क्लिनिकवर जाऊन समुपदेशन, शनिवार-रविवारच्या कार्यशाळा, वाचन, शोधनिबंध... आणि ठरवून झपाझप पूर्ण केलेले ललित लेखनाचे प्रकल्प! काय रहस्य आहे या सगळ्याचं?

– टाइम मॅनेजमेंट असा शब्द वापरतो आपण, तो चुकीचा आहे. कारण दिवसाचे २४ तास तर ठरलेले असतात, त्यात बदल नाही करू शकत आपण. म्हणजे वेळेचं व्यवस्थापन कसं करणार? व्यवस्थापन तर आपल्या स्वतःचं करायला हवं. उदाहरणार्थ- कुठल्या वेळेला कुठली कामं करायची, हे मी ठरवलेलं असतं आणि ती नियमितपणे मी ती करते. शिवाय सलग असा वेळ मिळण्याची वाट बघितली, तर तो कधीच मिळत नाही. कारण सतत काही ना काही व्यवधानं असतातच. वेळाचे जे मधे-मधे तुकडे मिळतात, त्यात कामं करायची सवय लावून घेतली आहे मी! समजा, मला दोन लेक्चरमध्ये २० मिनिटे वेळ आहे, तर त्या वेळात मी काही तरी लिहिते, वाचते. एरवी एवढ्याश्या वेळात काय करायचं म्हणून तो वेळ तसाच वाया जाण्याची शक्यता जास्त! मी टीव्ही बघत नाही, कारण काही मिळवण्यासाठी काही गोष्टी सोडाव्या लागतात.

विचारांनाही मी शिस्त लावते. उदाहरणार्थ- घरून कामाच्या ठिकाणी जाईपर्यंत मला एक तास लागतो. तर मी ठरवलेलं असतं की, अमुक एक ठिकाण येईपर्यंत कादंबरीच्या या भागाचा विचार करायचा. त्या ठिकाणाच्या पुढे- आज जे लेक्चर द्यायचे आहे, त्याचा विचार करायचा. किंवा असंच काही तरी. अर्थात हे जमण्यासाठी विचारांना शिस्त लावावी लागते, पण जमतं ते! सवयीनं अनेक गोष्टी आपोआप होतात. नाही तर असला वेळ काही तरी निरर्थक विचार करण्यात घालवतो आपण किंवा बेशिस्त वाहतुकीवर चिडचीड करतो. अर्थात, प्रत्येक वेळी शंभर टक्के हे जमेल असं नाही. कधी मूड जातो. दुसरंच काही तरी डोक्यात ठाण मांडून बसतं. अशा वेळी- 'ठीक आहे, होतं कधी कधी' असं म्हणून ते सोडून द्यायचं!

**प्रश्न :** नवीन काय लिहिताय?

– जगभरातल्या मानसशास्त्रज्ञांची गेल्या १०० वर्षांतली उत्कृष्ट ५० पुस्तकं निवडून त्यावर मी लिहिलं आहे. ते प्रकाशनाच्या वाटेवर आहे. 'आरईबीटी.' या विवेकनिष्ठ उपचारपद्धतीवर इंग्रजीत एक सविस्तर हँडबुक करायचं आहे, त्यावर काम चालू आहे.

**प्रश्न :** कोणताही पुरस्कार मिळाल्याचा आनंद तर असतोच. या कादंबरीला तो मिळाल्यावर काय वाटलं?

– पुरस्कार या कादंबरीला मिळाल्याचा आनंद विशेष अशासाठी की, त्यामुळे या विषयाकडे लक्ष जाईल, त्यावर चर्चा होईल. जो शब्दही उच्चारायला संकोच वाटतो, त्याबाबत संवादाची शक्यता निर्माण होणं ही जमेची बाजू म्हणता येईल.

**संध्या टाकसाळे**
sandhyataksale@gmail.com






# रा.शं. दातार नाट्य पुरस्कार
## **अनिलकुमार साळवे**

asalve465@gmail.com
Mob. : 8308905229

**संवादक : सिद्धार्थ तायडे**

बीड जिल्ह्यात जन्माला आलेले औरंगाबाद येथील देवगिरी महाविद्यालयात नाट्यशास्त्र शिकवणारे अनिलकुमार साळवे यांना 'ग्लोबल आडगाव', 'शेख मुहम्मद : मराठी माध्यम' आणि 'तिच्यासाठी वाट्टेल ते' या तीन एकांकिका लेखनासाठी हा पुरस्कार दिला जात आहे. त्यातील पहिली एकांकिका शहरीकरणात खेड्यांचे काय होते हे दाखविणारी, दुसरी एकांकिका दहशतवादी हल्ला होतो तेव्हा खेड्यातील मुस्लिमांकडे कसे पाहिले जाते ते सांगणारी, तर तिसरी एकांकिका पदवी घेऊन नोकरीच्या बाजारात फिरणारा तरुण रंगवणारी आहे. ग्रामीण जीवनातील विस्कटलेपण दाखवत, तळातल्यांची कैफियत मांडणारा हा नाट्यलेखक आहे.



महाराष्ट्र फाउंडेशन (अमेरिका) पुरस्कार २०१६ 'रा.शं. दातार नाट्यपुरस्कार' अनिलकुमार साळवे यांना तीन एकांकिका लेखनासाठी देण्यात येत असून 'शेख मुहम्मद मराठी माध्यम', 'ग्लोबल आडगाव', 'तिच्यासाठी वाट्टेल ते' या तिन्ही एकांकिका राज्यस्तरीय मानाच्या विविध स्पर्धांमधून गाजलेल्या आहेत. ग्रामीण भागातील विशेषत: मराठवाड्यातील आजच्या स्थितीवर भाष्य करणाऱ्या आहेत. साळवे यांनी आजपर्यंत 'वेदना', 'गांधीजींचा चश्मा हरवला आहे', 'राज्यकर्ता', 'अघटित', 'आम्ही बंदिस्त पाखरे' यांसह ३० एकांकिकाचं तर 'कथा खैरलांजी', 'ओयासिस', 'उद्ध्वस्त' इत्यादी नाटकांचे आणि चार लघुपटांचे लेखन-दिग्दर्शन केले आहे.

विविध स्पर्धांमधून त्यांना १६५ पुरस्कार आजपर्यंत प्राप्त झाले आहेत.

'शिरमी' व '१५ ऑगस्ट' या लघुपटास व्ही. शांताराम यांचा प्रभात पुरस्कार, लॉस एंजलिस अमेरिका यांसह राष्ट्रीय-आंतरराष्ट्रीय १८ पुरस्कार प्राप्त झाले आहेत.

**प्रश्न :** आपले बालपण कोठले आणि नाट्यलेखनाचा प्रारंभ कसा झाला, प्रेरणा कोठून मिळाली?

– मूठभर खायला, अंगभर ल्यायला, चूळभर प्यायला, पायभर निजायला... इतके इवलेसे स्वप्न पांघरून जगण्यासाठी वणवण करणाऱ्या कष्टकरी कुटुंबात माझा जन्म झाला. सालोसाल दुष्काळाच्या वावटळीत घिरट्या घेत, परिस्थितीशी झुंजत, पाण्यासाठी वणवण फिरणाऱ्या बीड जिल्ह्यातील माजलगाव या छोट्याशा गावात माझे बालपण गेले.

पाषाणात एखाद्या कोवळ्या कोंबाने मूळ धरावे, पाण्याविना मान टाकत, हवेतून पाणी पिऊन पुन्हा उभे राहावे, तसा मी पडत, धडपडत, रडत, घडत गेलो. आई रात्र खणून पहाट उकरायची, गाळात खोल-खोल बुडत चाललेला संसार उपसण्यासाठी हाडाची काडं करायची. बापाचे शिक्षण होऊनही हाताला काम मिळत नसे. गरिबी, बेकारी, वणवण... अपमानाच्या चक्रव्यूव्हात बाप फार अडकत गेला. दारूसारख्या अजगराने त्याला कधी विखळा घातला, हे त्यालादेखील कळले नाही. भंगी समाजातील गणेश वाल्मीकसोबत संडासच्या सडलेल्या टाक्या उपसण्याचे काम माझा बाप नाइलाजाने दारू पिऊन करायचा, कधी कैकड्याच्या घरी हातभट्टी काढायचा. भट्टीच्या नि दारूच्या अग्नीने शरीर जळले, दारिद्र्य अन् बेकारी व अपमानाने मन जळले. मेल्यानंतर समाजाने जाळले. आईचा फाटका संसार आणि आम्ही चार भावंडं दारूच्या ग्लासात खोल बुडत चाललो होतो. मोठा भाऊ सुनील आणि मी- दोघांनी एका हातात पेन आणि दुसऱ्या हातात वीट व दगड घेतले. गवंडीकाम करत आईचा दारूत रुतलेला संसार आम्ही उपसत होतो. जमेल तसे शिक्षणही घेत होतो.

## मुक्यांचा आवाज होण्याचा प्रयत्न करत राहीन!

ग्रामीण रंगभूमीवर इतक्या मोठ्या प्रमाणात काम चालू असते की, त्या प्रमाणात शहरी रंगभूमी काहीच नाही. पायलीची खंडीभर नाटके रंगभूमीवर येतात, पण ते लोक आपापल्या भागात राहून काम करतात. त्या रंगभूमीची दखल घेतली जात नाही. एखादे ग्रामीण नाटक असेल, तर त्याकडे ग्रामीण म्हणून न पाहता 'ग्राम्य' म्हणून पाहिले जाते. ग्रामीण रंगभूमीची धाटणी, तिची भाषा, स्वत:चे सिद्धांत आणि सादरीकरणातला साधेपणा हे तिचे सौंदर्य आहे. त्या सौंदर्याचा स्वीकार केला पाहिजे. आपल्याला परदेशी नाटककार जतन करता येतात, पण सोयगावचा लोटू पाटील जतन करता येत नाही.

कोंबडीने आपल्या पिल्लांना पंखात दडवून ठेवावं, तसं आई रात्री आम्हा भावंडांना पंखात लपेटून घ्यायची. रात्री बाप लेकराचा घात करील, या भीतीने ती दचकून उठायची आणि झोपेतच इवळायची. मी, भाऊ व माय रडत-लढतसंसार ओढायचो. सगळ्या परिस्थितीने काळावर न मिटणारे घाव केले. गरिबीला न घाबरता मी त्याला लढत गेलो, शिक्षण सोडलेच नाही. सातवीला असताना चुलतभाऊ राजेशने गम्मत म्हणून नाटक केले. त्याने सोडल्यानंतर नाटक मी हाती घेतले. संहिता मिळतच नाही, म्हणून, स्वत:चे जग मांडत मीच लिहिता झालो. माझ्या नाट्यलेखनाचा प्रारंभ १९९० मध्ये झाला. बालमजुराच्या जीवनावर आधारित 'आम्ही बंदिस्त पाखरे' ही एकांकिका लिहिली आणि तिला बरीच बक्षिसे मिळाली. नाटक काय असते, रंगभूमी कुठे आहे, कोण चालवते- काहीही माहीत नव्हते. माझ्या गावात कधीही नाटक आले नाही, तरीही मी नाटक करायला लागलो. माझा जिल्हा ऊसतोड कामगारांचा. ऐन दिवाळीच्या सणात लहान लेकरांना घरी ठेवून आई-वडील परमुलुखात ऊसतोडीसाठी जायला निघतात, तेव्हा छोटी कळती मुलगी आणि लहान लेकरं ट्रकमागे रडत धावत सुटतात. 'जाऊ नका नाऽ आम्हाला सोडूनऽ' हे त्यांचे बोल ऐकून काळीज कापायचे.

सर्वांत जास्त आत्महत्या बीडमध्ये झाल्या. उघड्या पडलेल्या घरा-दारावर कायम सुतक पडलेले असते. त्यांची लेकरं तरीही वाट बघतात- 'पप्पा परत येणारेय'. असे आया मुलांना सांगतात. या आत्महत्या नाहीत, व्यवस्थेने केलेल्या हत्या आहेत. हे सगळे सभोवतालचे जग मी नाटकात मांडत गेलो.

**प्रश्न :** महाराष्ट्र फाउंडेशनचा मानाचा पुरस्कार 'शेख मुहम्मद मराठी माध्यम', 'ग्लोबल आडगाव' आणि 'तिच्यासाठी वाट्टेल ते' यांचा समावेश आहे. त्यापैकी 'ग्लोबल आडगाव' ही काय संकल्पना आहे? ती कशी सुचली, ते सांगा.

- मुळात मी सुचलेले लिहीत नसून, टोचलेलं लिहितो. 'ग्लोबल आडगाव' ही एकांकिका शेतकऱ्यांच्या विस्थापनावर आधारित आहे. असे म्हणतात की, 'इंग्रज आले, आणि राज्य करून लुटून, छळ करून परत गेले; पण मला ते गेल्यासारखे वाटत नाहीत. कारण छळ, लूट, षड्यंत्र शेतकऱ्यांच्या बाबतीत आजही चालूच आहे. 'आज गावाचे लिलाव होत आहेत, उद्या शेतकऱ्यांच्या लेकरांचेही केले जातील!' आपण दिवाळी साजरी करतो, तेव्हा ते सुतकात असतात. वनवासी लेकरं... कळा आणि किंकाळ्या इतकेच त्यांच्याकडे उरले आहे. पेरण्या आणि मरणाच्या भीतीपेक्षा धोरणाच्या भीतीनेच शेतकरी जास्त खचत चालला आहे. 'मढ्याला पाणी पाजलं, तर म्हणे पुण्य लागते. शेतकऱ्यांनी धानाला पाणी पाजलं, तर त्याला जेल होते. का, तर म्हणे वीज चोरून धानाला पाणी पाजले!' कंपन्या हजारो वॉट वीज चोरतात, त्यांना मात्र संरक्षण दिले जाते. 'इंडिया विरुद्ध भारत' असा हा लढा आहे. भारत १८ तास लोड शेडिंगच्या अंधारात चाचपडतो आहे आणि इंडिया मात्र लक्ष-लक्ष दिव्यांच्या प्रकाशात चैनीचे जीवन जगत आहे. मांजरीने उंदीर खाण्यापेक्षा त्याचा छळ करण्यात तिला क्रूर आनंद वाटतो, तसा शेतकऱ्यांना छळून मारण्यात व्यवस्थेला आनंद वाटतो. ग्लोबलायझेशनचे मोठे आक्रमण शेतकऱ्यांच्या जीवनावर उठले आहे. आज कृषिसंस्कृती पूर्णपणे धोक्यात आलेली आहे. कॉर्पोरेट घराण्याची हुकूमशाही शेतकऱ्यांना गुलाम बनवू इच्छित आहे. हा विषय 'ग्लोबल आडगाव' या एकांकिकेतून मांडला आहे.

जंगलातील वाघ-बिबटे संपण्याची सर्वांना काळजी वाटतेय, पण शेतकरी संपत असल्याची काळजी कोणालाच वाटत नाही. 'स्मार्ट सिटी' केली जात आहे, खेडी कधी स्मार्ट होणार? कृषिव्यवस्थेचा विनाश करणे, हेच साम्राज्यवाद्यांचं ध्येय आहे. नैराश्य, उदासीनता, मजबुरी, लूट, यामुळे हवालदिल झालेला शेतकरी- त्यांच्या नष्ट होणाऱ्या पिढ्या आणि बीडमधील जन्माला पुरणारा दुष्काळ 'ग्लोबल आडगाव'मध्ये माझ्या माजलगांवच्या भाषेत मांडला आहे.

**प्रश्न :** 'शेख मुहम्मद : मराठी माध्यम'सारख्या स्फोटक विषयातून मुस्लिम तरुणाची व्यथा मांडलीत... विविध विषयांत हात घालणे कसे काय जमते?

- मला वाटते की, लेखकाने कोणत्या गटा-तटाचे न पाहता संपूर्ण मानव समाजाचे हित जपावे. आपण कोण आहोत, हे बाजूला ठेवून लेखन केलं की- संहितेचा शेवट माणुसकीने होतो. अनेक जण लिहिताना मर्यादा ठेवतात, लिहिताना राखून लिहितात; मी झोकून लिहितो. लेखकाने दोन्ही डोळ्यांचा वापर करत तिसऱ्या डोळ्याने पाहायला हवे. 'शेख मुहम्मद' ही मुस्लिम कुटुंबाची कथा नसून, व्यथा आहे. आतंकवादात पकडले गेलेले सगळे तरुण मुसलमानच का असतात? आणि प्रत्येक पकडला गेलेला

मुसलमान आतंकवादीच का असतो? अनेक मुस्लिम तरुण आतंकवादात पकडले जातात आणि १२-१३ वर्षांनंतर निर्दोष सुटतात; पण त्यांची ती १३ वर्षे परत कोण देणार? आत्ता एक सत्य घटना घडली. एक तरुण १४ वर्षांनंतर सुटला, घरी आला तर आईला पॅरालिसिस झालेला होता आणि वडिलांनी फाशी घेतली होती.

बीड येथे एक तरुण पकडला. त्याचा गुन्हा काय तर म्हणे, त्याने एका मोठ्या आतंकवाद्याला हिंदी भाषा शिकवली आहे. मुळात मी मुस्लिम समूहासोबत राहिलेलो आहे. बीडमधील मुसलमानांना हिंदी नीट बोलता येत नाही, 'मै पडा कोडास सांडा, टकूरा दुखरा, लईच अग्गाव है तू....' अशी हिंदी बोलणारे लोक काय शिकवणार? पण त्याने हिंदीचं ट्रेनिंग दिलं या कारणाखाली तो तरुण जेल भोगतो आहे. या कारणामुळे त्या कुटुंबाची समाजात, गावात, देशात कशी निंदा होते... त्यांना पदोपदी कसा अपमान सहन करावा लागतो, आपलेच लोक कसे दूर करतात, नमाजदेखील पढण्यासाठी मशिदीमध्ये बंदी घालतात... याचे मर्मभेदी चित्र मराठवाडी हिंदीमध्ये मी 'शेख मुहम्मद : मराठी माध्यम' एकांकिकेत मांडले आहे.

**प्रश्न :** तुम्ही सामाजिक विषय मांडता, पण 'तिच्यासाठी वाट्टेल ते' या एकांकिकेचे शीर्षक रोमँटिक वाटते... 'ती' म्हणजे नेमकी कोण?

– ती म्हणजे मनोरंजनीय 'ती' नव्हे. मुळात 'ती' म्हणजे नोकरी आहे... देशापुढील जटिल प्रश्न कोणता असेल, तर 'बेकारी'. अर्थातच, शिक्षणव्यवस्था, व यूजीसी हे बेकारी वाढवणारे कारखाने झाले आहेत. या एकांकिकेत नेट, सेट व पीएच.डी.धारक तरुणांचा संघर्ष मांडला आहे. अर्धे आयुष्य पदव्या मिळवण्यात खर्ची केल्यानंतर त्याच्या वाट्याला वणवणच येते. जेव्हा नोकरीची संधी मिळते, तेव्हा ३० लाख रुपये मागतात. ते पैसे मिळविण्याकरता त्याच्या वाट्याला जीवघेणा संघर्ष येतो, तो संघर्ष म्हणजे 'तिच्यासाठी वाट्टेल ते' ही एकांकिका आहे. यात शिक्षणक्षेत्राचे होत चाललेले बाजारीकरण या विषयावर प्रकाश टाकलेला आहे. शिक्षणक्षेत्रात चाललेला भ्रष्टाचार यात मांडला आहे. माणसं जितकी मोठी होतात तितकी नैतिक दृष्टीने खुजी होत जातात. मला वाटते, माणसाने लहान असताना माती खाल्ली तरी चालेल, पण मोठे होऊन शेण खाऊ नये.

**प्रश्न :** आपण परिवर्तनशील लेखन करता. नाटकाने परिवर्तन शक्य आहे का?

– रामदास फुटाणेसर म्हणतात, 'हा महाराष्ट्र तमाशाने बिघडला नाही आणि कीर्तनाने सुधारला नाही; म्हणून काही आपण परिवर्तनवादी लेखन करणं थांबवायचं नसतं.' खरे आहे ते. आमच्या गावाकडे मी पाहिले- एखादी म्हैस गाळात बसली, तर तिला त्यातून उठावं वाटत नाही. कारण त्या गाळात तिला खूप आनंद वाटतो. तशीच अवस्था भारतीय समाजाची झाली आहे. समाजाला गाळातच राहायला आवडते. त्या म्हशीला कितीही उठवा, मारा; उठत नाही, उलट तिला उठवणाऱ्याच्या दिशेने गाळाने भरलेलं शेपूट फेकून त्याला भरवण्याचे काम करते. परंतु एक छोटीशी गोमाशी म्हशीच्या कासाला डसते तेव्हा म्हैस ताड्कन उठून गटाराच्या बाहेर येते. मला वाटतं- माझं लेखन छोटी गामोशी होऊन रूढी, परंपरा, अंधश्रद्धांच्या गाळात रुतून बसलेल्या समाजाला डसण्याचे काम करत राहील.

**प्रश्न :** आपल्यासारखे नवोदित इतक्या तन्मयतेने दांभिकतेवर आसूड ओढण्याचे काम करत आहेत, ही आशादायक बाब आहे. आपण ग्रामीण भागात राहून रंगभूमी चालवता, पण आज ग्रामीण रंगभूमीच्या खाणाखुणा धूसर होताना दिसताहेत.

– ग्रामीण रंगभूमीवर इतक्या मोठ्या प्रमाणात काम चालू असते की, त्या प्रमाणात शहरी रंगभूमी काहीच नाही. पायलीची खंडीभर नाटके रंगभूमीवर येतात, पण ते लोक आपापल्या भागात राहून काम करतात. त्या रंगभूमीची दखल घेतली जात नाही. एखादे ग्रामीण नाटक असेल, तर त्याकडे ग्रामीण म्हणून न पाहता 'ग्राम्य' म्हणून पाहिले जाते. ग्रामीण रंगभूमीची धाटणी, तिची भाषा, स्वत:चे सिद्धांत आणि सादरीकरणातला साधेपणा हे तिचे सौंदर्य आहे. त्या सौंदर्याचा स्वीकार केला पाहिजे. आपल्याला परदेशी नाटककार जतन करता येतात, पण सोयगावचा लोटू पाटील जतन करता येत नाही. आम्हाला स्वत:च्या शेतीमालाचा धंदा करता येत नाही, तर नाटकाचा काय करणार? आम्हाला नाटकावर जगता येत नाही, आम्ही नाटकासाठी जगतो. राजकुमार तांगडेसारखा मोठा ताकदीचा नाटककार 'शिवाजी अंडरग्राऊंड'मुळे कळला, पण त्याअगोदरही त्याचे फार मोठे काम आहे, त्याचे जतन व्हावे.

**प्रश्न :** आपल्याला नाटकाची- साहित्याची कोणतीच परंपरा नसताना इतके प्रगल्भ लेखन कसे करता? कोणत्या पुस्तकांचा प्रभाव आहे आपल्यावर?

– मी दुर्गम भागातला. माझ्या गावात नाटक नव्हते. वाट्याला फारसे वाचन आलं नाही. पुस्तके वाचण्यापेक्षा मी माणसे जास्त वाचली. आपल्यावर अनेकांचा प्रभाव असतो, पण तो एक पुस्तक किंवा व्यक्तीचे नाव सांगून पूर्ण होणार नाही. विहीर भरते, तेव्हा एका पाझराने नव्हे, तर ती चहूबाजूने पाझराचे पाणी पिऊन भरते– कदाचित माझेही तसेच आहे.

**प्रश्न :** इतका मानाचा व मोठा पुरस्कार मिळाला... काय वाटते?

– आम्ही शेतकरी, कष्टकऱ्यांची लेकरं. अपमानाची इतकी सवय झालीय की, सन्मानाची भीती वाटते. पण हा सन्मान माझा नसून ग्रामीण रंगभूमीचा आहे.

**प्रश्न :** आपल्या जीवनातील एखादा भावनिक प्रसंग सांगा, ज्याने तुम्हाला अस्वस्थ केले.

– एक प्रसंग नव्हे, अनेक आहेत; पण एक सांगतो. वडील खूपच दारू पीत असत. मी त्यांना बिना-नशेचं कधीच पाहिलं नाही. एकदा मी त्यांना विचारले, ‘अण्णा, तू इतकी दारू का पितोस? मला वास येतो...’ बस्स, इथेच मी थांबलो. माझे शिक्षण जिल्हा परिषद शाळेत चालू होते. बाजूलाच पंचायत समितीचे क्वॉर्टर्स होते. तिथून शाळेत अचानक खूप उग्र वास सुटला. सर म्हणाले, ‘शाळा सुटली जा.’ आम्ही बाहेर येऊन पाहिले तर त्या क्वॉर्टरच्या बाजूला संडासाचे जुने टँक उपसण्याचे काम माझा बाप करत होता. माझ्या शाळेतील पोरांनी ओळखले– ‘ह्यो तर अनिलचा बापय...!’ मला खूप रडू येऊ लागले, कारण माझा अपमान होत होता. त्यानंतर बरेच दिवस मला माझ्या बापाची लाज वाटे, किळस वाटायची. चांगल्या घरातील मित्रांनी माझ्या घरी येणे कमी केले. मला जेव्हा कळू लागले तेव्हा वाटले, बाप परिस्थितीचा गुलाम होता. आजही समाजात घाण काम करणाऱ्यांची किळस केली जाते. त्यांना ‘घाण’ संबोधले जाते. पण घाण ‘ते’ नव्हे, ती टाकणारे वा करणारे घाण असतात. नाल्या, विष्ठा, उकिरडे साफ करणारे आठ दिवस संपावर गेले, तर देशाचे काय होईल? हे लोक आपले आरोग्य धोक्यात टाकून स्वतःच्या आरोग्याशी खेळतात आणि आपल्यासाठी परिसर स्वच्छ करतात. खरं तर त्यांचा सन्मान व्हावा. मला नकळतेपणात बापाची लाज वाटायची. आज कळते आहे– ‘माझा बाप घाण काढत नव्हता. देशाला घाणीतून बाहेर काढत होता.’ आज बापाचा अभिमान वाटतो.

**प्रश्न :** आपण नाटक करता-करता लघुचित्रपट दिग्दर्शित केले. त्याला राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय पुरस्कार मिळाले. ते कोणते लघुपट आहेत आणि काय विषय आहेत?

– मी जातपंचायतीवर आधारित ‘शिरमी’ नावाचा लघुपट केला. ही प.बंगालमध्ये घडलेली सत्य घटना आहे. एका आदिवासी समाजातील मुलीने परजातीतील मुलावर प्रेम केल्यामुळे जातपंचायतीने तिला शिक्षा सुनावली आणि एका रात्रीत त्या अल्पवयीन मुलीवर १३ लोकांनी बलात्कार केला. या घटनेवर लघुपट यासाठी बनवला की, ‘शिरमी’चे दुःख जगासमोर यावे. या लघुपटास अनेक राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय पुरस्कार मिळाले. ‘१५ ऑगस्ट’ नावाचा लघुपट केला. लॉस एंजलिस अमेरिकेने त्याची दखल घेतली. त्या लघुपटास १८ राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय पुरस्कार मिळाले आहेत. आता ‘डोंब’ नावाचा लघुपट बनवला आहे. ‘डोंब’मध्ये भुकेवाचून तडफडणारा जो वर्ग आहे, त्याच्या वेदना मांडल्या आहेत. मेळघाटात आज अन्न मिळत नसल्याने आईच्या पोटातला गर्भ पोटातच मरतो. लेकरांच्या होळ्या कराव्या लागतात. दोन कोटी मुले अशी आहेत, ज्यांना ‘स्ट्रीट चिड्रेन म्हणतात. अशा समूहाच्या वेदना ‘डोंब’मधून मांडल्या आहेत. आगामी काळात पूर्णकृती मराठी चित्रपट करण्याचा मानस आहे. त्याची संहिता लिहून झाली आहे.

**प्रश्न :** चित्रपट आणि नाटक यापैकी दोन्हींत काय आवडते?

– ‘नाटक श्वास आहे, पण चित्रपट ध्यास आहे’. दोन्हीही फार प्रभावी माध्यमे आहेत. याचा परिवर्तनासाठी वापर केला गेला पाहिजे. नाटकाला घरात घुसता येत नाही, पण चित्रपट घरात घुसला. आज प्रत्येकाच्या हातात त्याने आपली जागा तयार केली आहे. काळानुरूप आपणही चालले पाहिजे. नाटकाला मर्यादा आहेत, चित्रपटाला एकाच वेळी करोडो लोकांपर्यंत पोहोचता येते. मात्र चित्रपट करताना नाटक हरवू देणार नाही. दोन्ही माध्यमांचा उपयोग करून, धमा-र्धर्मात दुभंगलेली मने जोडण्याचा प्रयत्न करीन. व्यवस्थेने उंबरठ्याबाहेर फेकलेल्या रंजल्या-गांजलेल्यांचे दुःख मांडीन... ज्यांचे चेहरे हरवले आहेत, अस्तित्व असून त्या अस्तित्वाला नाकारले जाते आहे, अशा मुक्यांचा आवाज होण्याचा प्रयत्न करत राहीन.

**प्रश्न :** आपण ग्रामीण भागात राहून विपुल लेखन केलं आहे. ३० एकांकिका, ४ नाटकं, काही लघुपट, असंख्य गाणी हे सर्व करताना लेखनासाठी वेळ कसा काढता?

विद्यार्थ्यांसोबत १२ तास मित्र म्हणून राहता, मग लेखनासाठी प्रायव्हसी कशी मिळते?

– मला लेखनासाठी प्रायव्हसी आणि एसी लागत नाही. मुळात आपण 'येसी'बाहेरची माणसं....

**प्रश्न :** म्हणजे सभोवतालच्या जगाने तुम्हाला लिहिण्यास भाग पाडले, काय होते सभोवताली?

– मी अशा जिल्ह्यात जन्मलो ज्याच्या वाट्याला अपेक्षेशिवाय काहीच आले नाही. आमच्या इथे 'योजना आणि ढग कोरडेच येतात.' देश महासत्तेच्या वाटेने जात आहे आणि अजून माझ्या जिल्ह्यात रेल्वेच नाही. इथे शेकडोंने गावे आहेत, तिथे पाण्यासाठी दहा-बारा कोस दररोज वणवण करावी लागते. घरातील स्त्रियांच्या दिवस केवळ पाणी आणण्यातच मावळतो. अनेक स्त्रियांच्या माथ्यावरील केस गळून गेलेले आहेत, केवळ पाणी भरून. ते पाणीही दूषित असल्यामुळे बीडचा सरकारी दवाखाना गच्च भरलेला असतो. काही अशी गावे आहेत तिथे मुलांची लग्न जमत नाहीत, कारण त्या गावात पाणीच नसल्याने मुलींचे आई-वडील आपली मुलगी त्या गावात देण्यास तयार होत नाहीत, म्हणून पाहुण्यातीलच मुली त्यांना शोधाव्या लागतात. या नवयुगातली पुराण शोकांतिका आमच्या वाट्याला आलेली आहे. शिक्षणाचा झालेला खेळखंडोबा आणि परीक्षेत केवळ कॉप्या करूनच पास होता येते अशी मानसिकता आहे. परीक्षेच्या वेळी परीक्षार्थी कमी कॉपी देणारे जास्त असतात आणि काही शाळा अशाही आहेत अमूक अमूक रक्कम द्या, दहावीला जास्त टक्केवारी देतो आणि परीक्षेत उत्तरे बोर्डावर लिहून दिली जातात. ही मुले बीएड., डी.एड.ला लागतात आणि पुढे शिक्षक, प्राध्यापक होतात. असे शिक्षणाचे झालेले बाजारीकरण, खेळखंडोबा मी अनुभवलेला आहे. नाकळतेपणात मलाही कॉपी करायला खूप आवडायचे, मीदेखील कॉपी केली, पण जेव्हा कळू लागले की कॉपीमुळे परीक्षेत पास होता येईल, पण जीवनाची परीक्षा कशी पास होणार? आणि मग खऱ्या जगाचा शोध मी घेऊन लागलो. तिथे प्रस्थापितांनी जे काही सभोवताली जाळं मांडून ठेवलं आहे, त्या जाळ्यात अडकलेल्या नव्या पिढ्या आहेत, त्यांचा काहीही दोष नाही, अशा पिढ्या तिथे आजही घडत असतील तर त्यांच्या डोळ्यात उद्याचा भारत कसा शोधायचा? मग हे अवडंबर जगासमोर आलं पाहिजे म्हणून मला नाटकांनी लिहायला शिकवले... बालमजुरी ही काही हौस नाही ती मजबुरी आहे. आमच्याकडे घराघरात बालमजूर दिसतील. कामे नाहीत, उद्योगधंदे, कंपन्या, मॉल्स, व्यापारपेठ दूरदूर पहावयास मिळत नाही. शेतीवर घर भागत नाही, म्हणून घरातील लेकरांनाही कामे करावी लागतात. त्याचाच मीसुद्धा बळी आहे.

या बालमजुरीच्या अग्निकुंडात माझे बालपण जळाले, अज्ञान आणि अंधश्रद्धा मोठ्या प्रमाणात पहायला मिळेल, गावखेड्यात शिक्षण घेणे प्रचंड जोखमीचे असते. चिखल, पाऊस, ऊन झेलत बारा-तेरा कोस पायपीट करत शाळा-कॉलेज गाठावे लागते. यामुळे मुलींचे शिक्षण पूर्णपणे बंदच करावे लागते. आजही तिथे अशी मानसिकता आहे की, मुलगी म्हणजे परक्याचे धन. म्हणून एक काळ तिला घराच्या बाहेर येण्याची परवानगी नव्हती. आज आईच्या पोटातून बाहेर येण्याची परवानगी नाही. अशा मानसिकतेमुळेच मुलींच्या गर्भपाताचे प्रमाण राज्यात सर्वाधिक आमच्या जिल्ह्यात आहे. एक डॉक्टर पकडला, पोलिसांनी शोध घेतला असता समजले की, दवाखान्यामागील विहिरीत मुलींच्या गर्भपाताच्या तुकड्यांचे ढीग सापडले. दररोज शेकडोंनी गर्भपात होत होते, त्याला नष्ट करता येत नाही म्हणून कुत्रे पाळले होते आणि ते तुकडे कुत्रे खात असत. 'ती जन्माला आली तर, गिधाडवृत्तीचे माणसं खातात, पोटातच मारली तर कुत्रे खातात' तिला गिळण्याचे आणि खाण्याचे प्रमाण तिथे जास्त आहे.

या गोष्टींनी मनावर खूप खोल जखमा केल्यात, हे जगासमोर यावे. किमान माझ्या सभोवतालचे जग बदलावे या भोळ्या संकल्पनेतूनच माझ्या लेखनास सुरुवात झाली. सभोवतालचे जग किती बदलेल माहीत नाही, परंतु बदलाच्या क्रांतीची मशाल ती माझ्यापासून पेटवली आहे. यापुढेही ती कोणीतरी पेटती ठेवेल ही आशा आहे.

**प्रश्न :** रा.शं. दातार नाट्यलेखन हा फार मानाचा पुरस्कार मिळाला, समाधान वाटते का?

– समाधान नव्हे, खूपच आनंद झाला. हा पुरस्कार समाधानी राहण्यासाठी दिलेला नाही, आणखी काम करण्यासाठी दिला आहे.

**सिद्धार्थ तायडे**
Mob. : 9822836675



# महाराष्ट्र फाउंडेशन (अमेरिका) मराठी साहित्य पुरस्कारांचे मानकरी

### जीवनगौरव पुरस्कार

नारायण सुर्वे १९९४
मेघ:शाम पुंडलिक रेगे १९९४
मालतीताई बेडेकर १९९५
य. दि. फडके १९९५
श्रीपाद नारायण पेंडसे १९९६
विष्णू भिकाजी कोलते १९९६
गो. वि. तथा विंदा करंदीकर १९९७
वसंत पळशीकर १९९७
विजय तेंडुलकर १९९८
रा. भा. पाटणकर १९९८
पु. ल. देशपांडे १९९९
रा. चिं. ढेरे २०००
भालचंद्र नेमाडे २००१
ग. प्र. प्रधान २००२
मारुती चितमपल्ली २००३
दिलीप पुरुषोत्तम चित्रे २००४
बाबूराव बागूल २००५
रा. ग. जाधव २००६
भा. ल. भोळे २००७
रावसाहेब कसबे २००८
गो. पु. देशपांडे २००९
अरुण टिकेकर २०१०
मंगेश पाडगांवकर २०११
जयंत नारळीकर २०१२
कुमार केतकर २०१३
श्याम मनोहर २०१४
सुरेश द्वादशीवार २०१५
अरुण साधू २०१६

### विशेष पुरस्कार

भा. रा. भागवत : बालसाहित्य १९९६
उमा कुलकर्णी : भाषांतर १९९७
बाबूराव बागूल : दलित साहित्य १९९८
वसंत दावतर : मराठी भाषा, संशोधन व समीक्षा १९९९
रा. वि. सोवनी : मराठीतून विज्ञानप्रसार २०००
गंगाधर मोरजे : लोकसाहित्य २००१
दत्ता भगत : दलित साहित्य २००२
केशव मेश्राम : दलित साहित्य २००२
रा. रं. बोराडे : ग्रामीण साहित्य २००३
भास्कर चंदनशिव : ग्रामीण साहित्य २००३
मनोहर शहाणे २००५
रत्नाकर मतकरी २००६
महादेव मोरे २००७

### प्रकाशन संस्था

पॉप्युलर प्रकाशन, मुंबई १९९४
कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे १९९५
देशमुख आणि कंपनी, पुणे १९९६
मौज प्रकाशन गृह, मुंबई १९९७
साधना प्रकाशन, पुणे १९९८

### नियतकालिके / अनियतकालिके

नवभारत, वाई १९९४
आजचा सुधारक, नागपूर १९९४
मराठी संशोधन पत्रिका, मुंबई १९९४
समाज प्रबोधन पत्रिका, पुणे १९९५
भाषा आणि जीवन, पुणे १९९५
विचारशलाका, लातूर १९९५
अर्थसंवाद, कोल्हापूर १९९६
संशोधक, धुळे १९९६
पंचधारा, हैदराबाद १९९७
परिसर-वार्ता, पुणे १९९७
मराठी विज्ञान परिषद पत्रिका, मुंबई १९९८
पुरोगामी सत्यशोधक, पुणे १९९८
ताज (Thinkers' Academy Journal), मुंबई १९९९
सृष्टिज्ञान, पुणे २०००

बायजा, पुणे २००१
शब्दवेध, बुलडाणा २००४
अभिधानंतर, मुंबई २००५
परिवर्तनाचा वाटसरू २००६
पालकनीती, पुणे २००७

**ग्रंथ दुरस्कार : ललित**
ताम्रपट : रंगनाथ पठारे १९९४
दिवसेंदिवस : अनुराधा पाटील१९९४
भाऊ पाध्ये यांच्या श्रेष्ठ कथा : भाऊ पाध्ये १९९५
उदकाचिया आर्ती : मिलिंद बोकील १९९५
वनवास : प्रकाश नारायण संत १९९६
एकूण कविता : दोन : दिलीप पुरुषोत्तम चित्रे १९९६
युगान्त : महेश एलकुंचवार १९९७
कार्यरत : अनिल अवचट १९९८
शुभ्र काही जीवघेणे : अंबरीश मिश्र १९९८
अधांतर : जयंत पवार १९९९
कबीर : अनुवाद : मंगेश पाडगावकर १९९९
तणकट : राजन गवस २०००
आतंक : विलास सारंग २०००
कोरडी भिक्षा : श्रीनिवास कुलकर्णी २००१
तिची कहाणी : ना. धों. महानोर २००१
गल्ली बदललेला मोर्चा : राम दातोंडे २००१
मन्वंतर : दीनानाथ मनोहर २००१
तिरिछ आणि इतर कथा :
अनु. जयप्रकाश सावंत २००१
उत्तरायण : रवींद्र शोभणे २००२
हिरोशिमाच्या कविता :
अनुवाद : निरंजन उजगरे २००२
राहिले दूर घर माझे : शफाअत खान २००२
वकिल्या पारधी : लक्ष्मण गायकवाड २००३
जीवनायन : यशवंत मनोहर २००३
येरवडा विद्यापीठातील दिवस : कुमार सप्तर्षी २००३
राहीच्या स्वप्नांचा उलगडा : भारत सासणे २००३
आषाढमाती : श्रीकांत देशमुख २००४
खूप लोक आहेत : श्याम मनोहर २००४
पिढीजात : सतीश आळेकर २००४
भूमी : आशा बगे २००५
व्यवहाराचा काळा घोडा : अजीम नवाज राही २००५
निशाणी डावा अंगठा : रमेश इंगळे-उत्रादकर २००६
हॉटेल माझा देश : धम्मपाल रत्नाकर २००६
नंतर आलेले लोक : अरुण काळे २००७
आवानओल : अजय कांडर २००७
दर साल दर शेकडा : वीरधवल परब २००७
कुठल्याही विरामचिन्हाशिवाय :
अविनाश साळापुरीकर २००७
इडा-पिडा टळो : आसाराम लोमटे २००८
मी भिडवू पाहतेय समग्राशी डोळा :
प्रज्ञा दया पवार २००८
कवितान्तरण : चंद्रकान्त पाटील २००९
रिबोट : जी. के. ऐनापुरे २०१०
तृतीय पुरुषाचे आगमन :
मंगेश नारायणराव काळे २०११
अवकाळी पावसाच्या दरम्यानची गोष्ट :
आनंद विंगकर २०१२
पडझड : अशोक पवार २०१३
राखीव सावल्यांचा खेळ : किरण गुरव २०१४
तांडव : महाबळेश्वर सैल २०१४
खेळघर : रवींद्र रुक्मिणी पंढरीनाथ २०१५
विरंगी मी, विमुक्त मी : अंजली जोशी २०१६

**ग्रंथ : वैचारिक**
आस्तिक शिरोमणी चार्वाक : आ. ह. साळुंखे १९९४
आधुनिक मराठी वाङ्मयाची सांस्कृतिक पार्श्वभूमी :
गो. म. कुलकर्णी १९९५
हिंदू-मुस्लिम प्रश्न आणि सावरकरांचा हिंदू राष्ट्रवाद :
रावसाहेब कसबे १९९५
समाजपरिवर्तनाच्या दिशा : जनार्दन वाघमारे १९९६
जाळ्यातील चंद्र : म. वा. धोंड १९९६
नव वसाहतवाद आणि आधुनिक भारत :
गोपाळ राणे १९९७
तुकाराम दर्शन : सदानंद मोरे १९९७
नारायण मेघाजी लोखंडे : मनोहर कदम १९९७
आंबेडकर : नलिनी पंडित १९९८
साहित्यविवेक : म. द. हातकणंगलेकर १९९८
काश्मीर प्रश्न : ना. य. डोळे १९९९
दखनी भाषा : मऱ्हाटी संस्कृतीचा एक आविष्कार :
श्री. रं. कुलकर्णी १९९९




ताराबाई शिंदे लिखित स्त्री-पुरुष तुलना :
संपादक : विलास खोले १९९९
शोकात्म विश्वरूप दर्शन : जीवन आणि साहित्य :
स. रा. गाडगीळ २०००
नवरात्र : अशोक चौसाळकर २०००
कर्मयोगी संन्यासी : नरेंद्र चपळगावकर २०००
मार्क्सचा मानव विचार : मुरलीधर पवार २००१
प्राचीन भारत : समाज आणि संस्कृती :
म. अ. मेहेंदळे २००२
वि. स. खांडेकर सचित्र चरित्रपट : जया दडकर
२००२
साहित्य प्रत्यय : भा. ल. भोळे २००३
महर्षी विठ्ठल रामजी शिंदे : जीवन व कार्य :
गो. मा. पवार २००५
तुकाराम : अंतर्बाह्य संघर्षाची अनुभवरूपे :
म. सु. पाटील २००५
मराठी साहित्य : इतिहास आणि संस्कृती :
वसंत आबाजी डहाके २००६
वानप्रस्थ : गणेश देवी २००७
समाचार : जयदेव डोळे २००८
बदलते विश्व : कुमार केतकर २००९
साम्राज्यवादविरोध आणि जातिविनाश :
आनंद तेलतुंबडे  २०१०
महापुरुषांच्या नजरेतून स्त्री : मंगला आठलेकर २०११
बाईमाणूस : करुणा गोखले २०१२
डाकीण : संध्या नरे-पवार २०१३
समग्र निरीश्वरवाद : शरद बेडेकर २०१५

**ग्रंथ पुरस्कार : अ-पारंपरिक**

जिहाद : हुसेन जमादार १९९४
आक्रोश : भीमराव गस्ती १९९५
दशक्रिया : बाबा भांड १९९६
लॉरी बेकर : अतुल देऊळगावकर १९९७
विमुक्तायन : लक्ष्मण माने १९९८
दुष्काळ आवडे सर्वांना :
अनुवाद : हेमंत कर्णिक २००४
आयदान : उर्मिला पवार २००४
खाली जमीन वर आकाश : सुनीलकुमार लवटे २००७
तमाशा : एक रांगडी गंमत : संदेश भंडारे २००७
कथा मुंबईच्या गिरणगावाची :
नीरा आडारकर व मीना मेनन २००८
एका साळियाने : लक्ष्मीनारायण बोल्ली २००९
आणि दोन हात : वि. ना. श्रीखंडे २०१०
दगडावरची पेरणी : सय्यदभाई २०१०
वाचणाऱ्याची रोजनिशी : सतीश काळसेकर २०११
आपुलाचि वाद आपणासि : चंद्रकांत वानखडे २०११
आश्रम नावाचे घर : अचला जोशी २०११
जाग मना जाग : लीला आवटे २०१२
प्लॅटफॉर्म नंबर झिरो : अमिता नायडू २०१३
चित्रव्यूह व चलत्‌चित्रव्यूह : अरुण खोपकर २०१४
प्रतिमा-प्रचिती : नितीन दादरावाला २०१५
इर्जिक : अरुण जाखडे २०१६

**रा. शं. दातार नाट्य पुरस्कार**

ढोलताशे : चं. प्र. देशपांडे २००३
कळा या लागल्या जीवा : किरण पोत्रेकर २००४
छोट्याश्या सुट्टीत : सचिन कुंडलकर २००५
मळभ : किरण यज्ञोपवीत २००६
निब्बाण : अरुण मिरजकर २००७
ते पुढे गेले : मकरंद साठे २००८
खेळीमेळी : चंद्रशेखर फणसळकर २००९
आनंदभोग मॉल : आशुतोष पोतदार २०१०
बया दार उघड : सुषमा देशपांडे २०११
काय डेंजर वारा सुटलाय : जयंत पवार २०१२
राजकुमार तांगडे (अभिनय व लेखनासाठी) २०१३
हिंमाशू स्मार्त : जत्रेतलं जायंट व्हील २०१४
सुसाट : अजित देशमुख २०१५
अनिलकुमार साळवे २०१६

**नाट्य क्षेत्रातील विशेष कामगिरीसाठी पुरस्कार**

**रा. शं. दातार विशेष नाट्यपुरस्कार**

अतुल पेठे २००६
मराठी रंगभूमीच्या तीस रात्री : मकरंद साठे २०१३



# महाराष्ट्र फाउंडेशन (अमेरिका) समाजकार्य पुरस्कारांचे मानकरी

**१९९६**
समाजप्रबोधन (संस्था) :
महाराष्ट्र अंधश्रद्धा निर्मूलन समिती, सातारा
समाजप्रबोधन (व्यक्ती) : विलास वाघ, पुणे
पर्यावरण-संवर्धन (व्यक्ती) :
वासुदेवराव चित्रे, पालघर
स्त्रियांचे प्रश्न (व्यक्ती) : विजया चौक, धुळे
वैशिष्ट्यपूर्ण समाजकार्य (व्यक्ती) :
रा. वि. भुस्कुटे, अंबरनाथ

**१९९७**
स्त्रियांचे प्रश्न (संस्था) :
कागद-काच-पत्रा कष्टकरी पंचायत, पुणे
समाजप्रबोधन (संस्था) : लोकविज्ञान संघटना, पुणे
स्त्रियांचे प्रश्न (व्यक्ती) : शुभदा देशमुख, गडचिरोली
पर्यावरण-संतुलन / संरक्षण (व्यक्ती) :
विजय नारकर, देवरूख
वैशिष्ट्यपूर्ण समाजकार्य (व्यक्ती) :
लीला पाटील, कोल्हापूर

**१९९८**
पर्यावरण-संतुलन / संरक्षण (संस्था) :
निसर्ग मित्र मंडळ, औरंगाबाद
समाजप्रबोधन (व्यक्ती) : जयंत गडकरी, मुंबई
स्त्रियांचे प्रश्न (व्यक्ती) :
बापूसाहेब नागाप्पा म्हेत्री, गडहिंग्लज
पर्यावरण-संतुलन / संरक्षण (व्यक्ती) :
हुमायून अब्दुलअली, मुंबई
वैशिष्ट्यपूर्ण समाजकार्य (व्यक्ती) :
सुरेखा दळवी, पेण

**१९९९**
प्रबोधन (संस्था) : समाजवादी प्रबोधिनी, इचलकरंजी
समाजप्रबोधन (व्यक्ती) : मोहन हिराबाई हिरालाल, चंद्रपूर
स्त्रियांचे प्रश्न (व्यक्ती) : रेहाना बैलिम, अमरावती
पर्यावरण-संतुलन / संरक्षण (व्यक्ती) :
कुसुम कर्णिक, पुणे
वैशिष्ट्यपूर्ण समाजकार्य (व्यक्ती) :
भरत कावळे, नाशिक

**२०००**
स्त्रियांचे प्रश्न (संस्था) :
महिला हक्क संरक्षण समिती, नाशिक
समाजप्रबोधन (व्यक्ती) : मनोहर कदम, मुंबई
पर्यावरण-संतुलन / संरक्षण (व्यक्ती) :
चिं. धों. आसवले, पुणे
वैशिष्ट्यपूर्ण समाजकार्य (व्यक्ती) :
संजय संगवई, पुणे.

**२००१**
पर्यावरण-संतुलन / संरक्षण (संस्था) :
ॲकॅडमी ऑफ डेव्हलपमेंट सायन्स, कर्जत
समाजप्रबोधन (व्यक्ती) : मु. ब. शहा, धुळे
स्त्रियांचे प्रश्न (व्यक्ती) : कुमुद पावडे, नागपूर
वैशिष्ट्यपूर्ण समाजकार्य (व्यक्ती) :
काळुराम दोधडे, पालघर
समाजकार्य सन्मान (व्यक्ती) :
प्रभाकर म्हसकर, अंमळनेर

**२००२**
समाजप्रबोधन (संस्था) :
डॉ. पी. व्ही. मंडलीक ट्रस्ट, मुंबई
स्त्रियांचे प्रश्न (व्यक्ती) :
भुरीबाई मानसिंग शेमळे, नंदुरबार
वैशिष्ट्यपूर्ण समाजकार्य (व्यक्ती) :
रजिया सुलताना, अमरावती
समाजकार्य सन्मान (व्यक्ती) : दत्ता इस्वलकर, मुंबई
डॉ. विवेक मॉंटेरो, मुंबई, डॉ. राम पुनियानी, मुंबई





२००३
समाजप्रबोधन (संस्था) :
कोयना जीवन हक्क संरक्षण संघटना, कोरेगाव, सातारा
स्त्रियांचे प्रश्न (व्यक्ती) : रझिया पटेल, पुणे
समाजकार्य सन्मान (व्यक्ती) :
शेख वजीर पटेल, अमरावती
सुरेश शिपूरकर, कोल्हापूर
आनंद पटवर्धन, मुंबई
उल्का महाजन, रोहा, रायगड

२००४
समाजप्रबोधन (संस्था) :
समाज विज्ञान अकादमी, पुणे
मासूम, पुणे
समाजकार्य सन्मान (व्यक्ती) :
तिस्ता सेटलवाड, मुंबई
रमेश हरळकर, मुंबई
पोपटराव पवार, अहमदनगर
डॉ. मोहन देशपांडे, पुणे
विलास भोंगाडे, नागपूर

२००५
समाजप्रबोधन (संस्था) :
लोकपंचायत, संगमनेर, जि. अहमदनगर
श्रमिक महिला विकास संघ, वसई
समाजकार्य सन्मान (विशेष पुरस्कार) :
श्री. लीलाधर हेगडे, मुंबई
समाजकार्य सन्मान (व्यक्ती) :
प्रा. यशवंत सुमंत, पुणे
श्री. लक्ष्मण माने, करंजे, जि. सातारा
श्रीमती प्रतिभा शिंदे, नंदुरबार
श्रीमती पूर्णिमा मेहेर, पालघर
श्रीमती सुषमा शर्मा, वर्धा
सत्कार : श्री. सुरेश खोपडे, मुंबई

२००६
समाजप्रबोधन (संस्था) :
आंबेडकर अकादमी, सातारा
पुणे शहर मोलकरीण संघटना, पुणे
समाजकार्य सन्मान (विशेष पुरस्कार) :
पन्नालाल सुराणा
समाजकार्य सन्मान (व्यक्ती) : रूपा कुळकर्णी, नागपूर
अनंत फडके, पुणे
वाहरू सोनवणे, नंदुरबार
सत्कार : मनीषा वर्मा

२००७
समाजप्रबोधन (संस्था) :
हॅलो मेडिकल फाउंडेशन, अणदूर, जि. उस्मानादाबाद
स्त्री मुक्ती संघटना, मुंबई
समाजकार्य सन्मान (विशेष पुरस्कार) :
प्रा. एन. डी. पाटील, सातारा
समाजकार्य सन्मान (व्यक्ती) : प्रदीप प्रभू, डहाणू
अन्वर राजन, पुणे, राजन इंदुलकर, चिपळूण
सत्कार : प्रकाश विश्वासराव

२००८
समाजकार्य जीवनगौरव (व्यक्ती) :
डॉ. बाबा आढाव, पुणे
समाजप्रबोधन (व्यक्ती) : डॉ. आनंद तेलतुंबडे
पर्यावरण संरक्षण संवर्धन (व्यक्ती) : कुंजबिहारी
परिवर्तनक्षम शैक्षणिक कार्य (व्यक्ती) :
अर्जुन कोकाटे
दलितांचे प्रश्न : व्यंकप्पा भोसले
सामाजिक सलोखा : सुरेश खैरनार
युवा कार्यकर्ता : सिम्प्रित सिंग

२००९
जीवनगौरव (व्यक्ती) : व्यंकटअण्णा रणधीर
समाजप्रबोधन : सुभाष वारे
सामाजिक प्रश्न : बंड्या साने
असंघटित कष्टकरी : श्रीनिवास कुलकर्णी
युवा कार्यकर्ता : योगिनी खानोलकर

२०१०
जीवनगौरव (व्यक्ती) : नागनाथअण्णा नायकवडी
विशेष कार्य : चंद्रकांत केळकर
समाजप्रबोधन : सत्यपाल महाराज
असंघटित कष्टकरी : बस्तू रेगे
सामाजिक प्रश्न : हरीष सदानी

युवा कार्यकर्ता : नीलेश निमकर
लक्षवेधी प्रशासकीय कार्य : लक्ष्मीकांत देशमुख

**२०११**
समाजकार्य जीवनगौरव : जी. जी. परीख
समाजप्रबोधन : सुनीती सु. र.
असंघटित कष्टकरी : सुभाष लोमटे
सामाजिक प्रश्न : ब्रायन लोबो
विशेष कार्य : ज्योति म्हापसेकर
विशेष कार्य : नीलिमा मिश्रा

**२०१२**
समाजकार्य जीवनगौरव : ठाकूरदास बंग
समाजप्रबोधन : माधव बावगे
सामाजिक प्रश्न : बाळकृष्ण रेणके
असंघटित कष्टकरी : शिवाजी कागणीकर

२०१३
समाजकार्य जीवनगौरव : रयत शिक्षण संस्था
समाजप्रबोधन : गजानन खातू
असंघटित कष्टकरी : धनाजी गुरव
सामाजिक प्रश्न : डॉ. अशोक बेलखोडे

२०१४
समाजकार्य जीवनगौरव : पुष्पा भावे
समाजप्रबोधन : रमेश गावस
सामाजिक प्रश्न : बिंदुमाधव खिरे
असंघटित कष्टकरी : मनीषा तोकले

२०१५
समाजकार्य जीवनगौरव : विद्या बाळ
समाजप्रबोधन : भीम रासकर
असंघटित कष्टकरी : पल्लवी रेणके
सामाजिक प्रश्न : कृष्णा चांदगुडे

२०१६
समाजकार्य जीवनगौरव : हमीद दलवाई (मरणोत्तर)
समाजप्रबोधन : देवजी तोफा
सामाजिक प्रश्न : विजय दिवाण
असंघटित कष्टकरी : सुशीला नाईक

**डॉ. नरेंद्र दाभोलकर स्मृति-पुरस्कार :**
विवेक सावंत / २०१३
निखिल वागळे / २०१४
उत्तम कांबळे / २०१५
अतुल पेठे / २०१६



डॉ.नरेंद्र दाभोलकर संस्थापक-कार्याध्यक्ष राहिलेल्या महाराष्ट्र अंधश्रद्धा निर्मूलन समितीला महाराष्ट्र फाउंडेशनचा पहिला समाजकार्य पुरस्कार (१९९६ मध्ये) मिळाला होता आणि 'दशकातील सर्वोत्तम कार्यकर्ता' हा दहा लाख रुपयांचा पुरस्कार (२००६ मध्ये) डॉ.दाभोलकरांना अमेरिकेत बोलावून दिला गेला होता. २००९ मध्ये महाराष्ट्र फाउंडेशनच्या साहित्य व समाजकार्य पुरस्कारांचे संयोजन साधना ट्रस्टकडे आल्यानंतर, सर्व नियोजन डॉक्टरांच्या नेतृत्वाखाली केले जात होते. त्यामुळे त्यांच्या स्मृतिप्रीत्यर्थ फाउंडेशनने एक नवीन पुरस्कार सुरू करणे अगदीच साहजिक होते.

डॉ.दाभोलकर स्मृतिपुरस्कारासाठी व्यक्तीची निवड करताना चार प्रमुख निकष लावले जातात.

१. धर्मनिरपेक्षता व वैज्ञानिक दृष्टिकोनाचा प्रचार व प्रसार करण्यात त्या व्यक्तीचे योगदान असले पाहिजे.
२. त्या व्यक्तीने आपल्या कार्यक्षेत्रात काही एक ध्येयवाद समोर ठेवून व सामाजिक बांधिलकी मानून कार्य केले असले पाहिजे.
३. पुरोगामी संस्था-संघटना-चळवळी यांना प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष बळ देणारी ती व्यक्ती असली पाहिजे.
४. मागील किमान दोन दशके काम केले आहे आणि पुढील दशकभर काम करण्याची क्षमता त्या व्यक्तीमध्ये असली पाहिजे.




# Maharashtra Foundation Projects

Over the last decade, Maharashtra Foundation has gained visibility and recognition in India through its prestigious Literature and Social Service awards. Every year, we honor individuals and institutions in India that have achieved distinction in these fields. These awards are now very well recognized in the field.

The bulk of Maharashtra Foundation's work however is less well known. For over 35 years, Maharashtra Foundations has been working to improve the lives of people throughout the state of Maharashtra, the rest of the country, as well as other parts of the world. Some examples of our crisis intervention efforts are:

- Post-Earthquake Rebuilding in Latur, Maharashtra
- Earthquake Relief in Haiti
- Post-Earthquake Rebuilding in Gujarat, India
- Relief for victims after Hurricane Sandy in the Eastern USA.
- Rebuilding in Nepal after the recent Earthquake

Over the last 3 decades we have also partnered with numerous NGOs in India, in an ongoing effort to improve the lives of the needy. Some of our notable partnersare:

- Parivartan - Blind Faith Elimination
- CASP – Sponsorship of children's education and development
- Nari Samata Manch – Women's Rights Advocacy
- Think Maharashtra – Literacy Promotion
- Youssouf Meharalli Foundation – Social Improvement
- Men against violence (MAVA) – Engaging men as partners in Women's Rights

These are only a few examples. Maharashtra Foundation supports over 200 NGO'S In India each year with the aim of creating social and economic impact on the lives of the needy.

Each year the foundation receives up to 50 requests for funding from NGOs in India. We have a standing Project committee that scrutinizes these applications through criteria such as the relevancy of the organization and the project, interviews with office bearers of the organization, review of the project plan and past performance history. We fund projects that fall under the purview of our mission of Social Justice and Women's Empowerment. We are proud to present to you the Projects we have selected this year for funding.

CHAITANYA :

**Promote Healthcare Jankar (Healthcare)**

Aim is to provide access to quality healthcare and absorbing health shocks financially. The operational areas will focus on rural and semi-urban villages, where there is a significant population living below the poverty line. The primary occupation of the households is agriculture.

PROJECT OBJECTIVES: 1. Chaitanya

is launching a comprehensive community-based micro-health insurance model that enables members to share their risks of illness as a community. 2. To decrease the burden of health illnesses, those who purchase the product receive discounted out-patient (OPDs) and inpatient services, medicines, and diagnostic tests at network facilities. 3. To increase the quality of care received. 4. The product promotes preventative care measures. Chaitanya will appoint one doctor for every 500 self-help groups to visit remote underserved regions where medical facilities are not as available. The doctor will be assisted by Jankar (Jaankaar).

Jankars are members of the local community recruited to serve as health resource persons. They will be trained in preventative health care through the certificate program offered by the state open university. The Jankars will focus on increasing awareness through relevant health camps, encouraging proper health care usage, promoting preventative measures, providing referrals to network hospitals, and assisting with minor health problems; the Jankars will serve as an interface between members, the insurers, and medical facilities.

### WRCS - Wildlife Research Conservation Society : **Prevent Deforestation (Environment Protection)**

Vision and Mission Statement of Organization is to bring about a society that respects nature, upholds these principles in its policies and laws, and uses natural resources judiciously so that wildlife and forests are conserved. Goal of the Organization is to ensure that India's wildlife and forests are well protected and safe for posterity.

PROJECT OBJECTIVES: 1. to carry out research studies that will generate scientific information that will help to guide management actions for wildlife conservation. 2. To implement projects with participation of local community and government agencies for wildlife and forest conservation. 3. To carry out advocacy to bring about policy changes that will be beneficial for conservation of wildlife and forests. 4. To create awareness about wildlife and forest conservation in the public, the government executives and the policy makers. Major area of work is conservation of private forests; WRCS has carried out studies that help to further information on conservation of private forests in Western Ghats of Maharashtra. WRCS is carrying out a project for conservation of private forests at Koyna with participation of local community.

### JVK - JAMKHED VIKAS KENDRA : **Support for orphans and vulnerable groups (Underprivileged)**

Support for Orphans & Vulnerable. GraminVikas Kendra, Jamkhed was founded in 1995 as non-profit organization in Ahmednagar of Maharashtra. It was started by





